


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका



हास्य
विनोद
विशेषांक

# दीपावली

वर्षारंभ •• मार्च '६८ •• वर्ष २४ वें •• मूल्य १।। रुपया





अनुक्रमणिका











अनुक्रमणिका



वर्षारंभ

विशेषांक

# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य कला-विलास

मार्च १९६८ • वर्ष २४ वे • मूल्य १॥ रु.

## श्रे य ना मा व लि–

**शापित गंधर्व**...भावपूर्ण श्रद्धांजलि–**दीनानाथ दलाल** • **अंगना तो पर्बत भई**...**कलाकार भोबे** यांना एक श्रद्धांजलि–**जितेंद्र अभिषेकी** • **हिसका**...द्विपाद मर्कटाना पहिलवानांनी दिलेला तडाखा–**प्रा. उत्तम शिरवळकर** • **शिव्या**... बेफाम विनोदी लेख–**डॉ. बाळ गांगल** • **खून पहावा करून**...अन् काय शेवटी खून कुणाचा !–**पंडित क्षीरसागर** • **पुढारी पहावा पळवून**...शंभर टक्के विनोदी कथा–**वा. रा. सोनार** • **प्रीत पिऊनिया मोही रिती**... धुंद जीवनाची चटकदार प्रणयगाथा–**निवेदक प्रभाकर अत्रे** • **प्रेम कसे करावे**....व्यवसायिकांची वहारदार कथन-कहाणी–**राजा राजवाडे** • **नाटयसमीक्षकावर खुनाचा आरोप**–अभिरूप खटल्याची रंगदार कैफियत–**ज्ञानेश्वर नाडकर्णी**

याशिवाय **रंगमंच**... ललितकलादर्शाचा हीरक महोत्सव (उत्तरार्ध), **सन्मानपुष्पे, ऐसी अक्षरे रसिके**– 'शापित गंधर्व' व 'चिद्घोष'–इ. इ. आणि

### राजकीय शिमगा आणि बहुरंगी पिचकाऱ्या

**मर्मभेदक मासिक व्यंगचित्रमाला**

Gram: Dalalart

टे. नं. ३५७७६५




★ संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. यानी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किमत १॥ रु. + रजि. पोस्ट ६० पै. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57

DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.



अनुक्रमणिका




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२-५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६-००**

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्याचं** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात यते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनी स्टेट्स पीपल प्रस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ यथ छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# मातीचे इमान राखले आहे

"दीपावली"चा चोवीसाव्या वर्षाचा हा वर्षारंभ अंक रसिक वाचकांच्या हाती देताना आम्हास दु:खमिश्रित आनंद होत आहे. वाढदिवस म्हणून आनंद आणि जन्मले ते वाढणारच ह्या पद्धतीने आम्ही वाढलो नाही, म्हणून आनंद होत आहे. आणि 'दीपावली'चे एक कुटुंबीय सुहृद गोपाळकृष्ण भोबे अकाली निधन पावले म्हणून दु:ख! ! ह्या वाढण्यात काही योजना, शिस्त, पद्धत आणि धडपडही आहे. कलेच्या प्रवासातले हे महत्वाचे पाथेय आहे. प्रत्येक 'वाढता' कलाकार हे पाथेय घेऊनच वाढत असतो. ज्या कलासाधकाची स्वप्ने पाहण्याची शक्ती संपते त्याची निर्मिती थांबते, विकास संपतो. 'दीपावली' स्वप्ने पहात आली आणि मान्यवरांच्या लेखणीच्या द्वारे ती स्वप्ने ह्या सृष्टीवर उधळीतही आली आहे. त्या स्वप्नात रुचिरता होती. लेखकांच्या लेखणीने नटवलेली ती स्वप्नेही आल्हादक होती. प्रेरक होती. जीवनातून उठविणारी, 'पराभूत' म्हणून पळायला लावणारी, उबग आणणारी, जुगुप्सा उत्पन्न करणारी, 'सस्ती' अशी कधी नव्हती हे नमूद करताना 'दीपावली'ला अभिमान वाटतो. 'दीपावली'ने "हिमालयीन" स्वप्ने पाहिली—दाखविली नसतील कदाचित, पण सह्याद्रीचा ताठ कणा मात्र कधी सोडला नाही. स्वप्ने पाहतांना व रंगविताना मातीतले घट्ट रोवलेले पाय कधी सोडले नाहीत. काळ्या मातीचे इमान कायम राखले. ही माती आमची आहे आणि आम्हीच तिचे सेवक आहोत हीच श्रद्धा आम्ही मनोमन मानली.

गेल्या वर्षात दीपावलीने ह्या मातीची काय सेवा केली ? "अंक निघाले — काही खपले—काही उरले" एवढ्या सोप्या परिभाषेत नमूद करता येईल इतपत सेवा ? नाही. गेला वर्षारंभ अंक म्हणजे प्रति 'दिवाळी अंक'च होता. दळवी, मंत्री, सबनीस, गोवईकर, डॉ. गांगल, दा. गो. देशपांडे, शां. शं. रेगे — ही तर दिवाळी अंकातील लेखकांची यादी ! संगीत अंक ही तर 'गोड' भेट ! अभिषेकी— भोव्यांचे संगीत गोड आणि लेखनही गोड ह्याचा प्रत्यय देणारी भेट ! कन्नड रंगभूमीचे भूषण असलेल्या टी. पी. कैलासम् यांच्या 'कीचका'ची भेट यंदा आम्ही नव्याने दिली. दिवाळी अंकाला मानकऱ्यांनी मैफल सजवली. वा. रा. कान्त ह्यांनी एक तरल—कोमल काव्यनाट्य दिले (कुमार) भावे, गोखले, चोरघडे, पु. ल. देशपांडे, दळवी, मंत्री, अच्युत बर्वे आदि मंडळींनी 'निवडक' व कलापूर्ण साहित्य दिले. गोडसे, धोंड यांनी उत्तम लेख दिले. अंक सजला (आणि गाजलाही) काही नवे लेखक 'कुटुंबीय' झाले. तेवीस वर्षात 'दीपावली'चे कुटुंब सतत वाढतच गेले आहे. जीवनाप्रमाणेच कलेचाही 'प्रवास' चालू असतो. माणसे येतात. जातात. गाडी चालूच राहते. जीवन प्रवाही असते हे जर खरे मानले तर हा प्रवास, हे येणे, थांबणे, उतरून जाणे हेही अपरिहार्यच मानले पाहिजे. जीवनाच्या व कलेच्या प्रवाहित्वावर व गतिमानतेवर 'दीपावली'ची श्रद्धा आहे.

स्वराज्यात लोक आणि लोकशाहीचे संरक्षण ही एक अपरिहार्य गोष्ट ! त्यासाठी सैन्यदळे सुसज्ज हवीत. सैन्य-जनता समन्वय साधून भारतीय स्वातंत्र्य स्थिरपद व्हावे म्हणून गतवर्षी दीपावलीने 'नौदल-विशेषांक' काढला. यंदा 'संरक्षण विशेषांक' काढीत आहोत. संगीताचा सूर तर दीपावलीला सापडला आहे. आणि कथा ? माणसाना 'गोष्टी'चे वेड फार ! मनाला सुसंस्कृत, उन्नत करणारे वेड. दीपावली हे पुरवणार आहे. दिवाळी तर सणांचा राजा. राजाला पडणारी स्वप्ने राजशाहीच हवी. यंदा दीपावलीला असेच एक 'रमणीय' स्वप्न पडले आहे. रौप्यमहोत्सवी वर्षाच्या उंबरठ्यावर 'दीपावली' उभी आहे. ते स्वप्न ऐन तारुण्याची ग्वाही देईल. (तपशील इतरत्र)

ह्या प्रवासात ज्यांनी ज्यांनी साथ दिली, देत आहेत, देतील त्या साऱ्यांबद्दलच "दीपावली" कृतज्ञ होती, राहील.

कलेच्या प्रवासालाही 'सोबत' लागते. 'दाद' लागते.

—संपादक







# शापित गंधर्व



"गोपाळकृष्ण भोबे गेले" फोनवर आलेल्या ह्या संदेशावर अजूनही विश्वास बसत नाही. बोल बोलत नाहीत. वीणा झंकारत नाही. सूर फुलत नाहीत, लय साधत नाही. पैंजण झणत्कारत नाहीत, गंधर्वांनी गायन सोडले?

छे : छे : ! सारे विपरीत. हे कसे शक्य आहे ? हे होणे नाही ! "गोपाळकृष्ण भोबे गेले" ह्या शब्दसंहितेवर अजूनही विश्वास बसत नाही. कारण ते एक मूर्तिमंत चैतन्य होते. श्रद्धा होती. भक्ति होती. एक रसज्ञ–मर्मज्ञ शक्ति होती. मूर्तिमंत रसिकता म्हणजे भोबे, मूर्तिमंत भक्ति –श्रद्धा म्हणजे भोबे, दिव्यत्वाची जेथ प्रचीति येत असे तेथे तेथे एखाद्या तुकाराम-नामदेवाच्या श्रद्धेने भोबे नतमस्तक होत असत. त्याठिकाणी वय-जात-पंथ-धर्म-सामाजिक स्थान-दर्जा यांचा विचार भोब्यांनी कधी केला नाही. स्वतःच्या वागण्याने त्यांनी तो इतरांनाही विसरायला लावला. इतके निर्व्याज, निरागस, रसिक, श्रद्धाळू मन भोब्यांना लाभले होते. आणि म्हणूनच "भोबे गेले" ह्या शब्दसंहितेवर अजूनही विश्वास बसत नाही.

सूर मुके झाले. नाद घुमेनासा झाला. वीणेच्या तारा तुटल्या. रंग उडून गेले. सुरांच्या आणि रंगांच्या किती तरी कथा आणि व्यथा भोब्यांच्या शब्दातून बोलू लागल्या होत्या त्या मूक झाल्या. त्या कथाना आणि व्यथांना सुंदर व सुकोमल शब्दांचे लेणे चढविणारा, सुरात आणि रंगात न्हाऊन काढणारा कथाकार स्वतःच एक फार मोठी कथा (आणि व्यथा) मागे ठेवून निघून गेला आहे. तानपुरा गवसणीत बांधला गेला आहे. तबल्याने बोल गमावले आहेत. कोठ्याकोठ्यातून आणि सुरांच्या मैफलीतून भोब्यांना आवाहन करणाऱ्या त्या "सुरश्री" आज मूक झाल्या आहेत. आज तेथे सूरगंगा स्रवत नाहीत. अश्रु पाझरत आहेत. व्यथा ह्या नव्या व्यथेने थरथरत आहेत.

"गोपाळकृष्ण भोबे" ही एक बहुगुणी, बहुरंगी, बहुढंगी, व्यक्ति होती. त्यांना संगीताचे कान होते, चित्रकाराची दृष्टि होती, कथाकाराचे मन होते, भाष्यकाराची रसिकता, मर्मज्ञता होती, तुकाराम – नामदेवाची भाविकता होती, बालकाची निरागसता होती, निर्व्याजता, निर्मळता होती, एकलव्याची निष्ठा होती, विजेचे चैतन्य होते. धडपड होती. साधकाचे 'पाठांतर' होते. कलांवरची असीम श्रद्धा होती. आणि श्रद्धेसाठी जी झीज सोसावी लागते ती सोसण्याची मानसिक व शारीरिक तयारी होती. साधकाजवळ सिद्धीसाठी आवश्यक असणारी व कुठेही जाऊन भिडू शकणारी 'डॅश' होती. नाटक कंपनीचे फलक रंगविणारा हा 'चित्रकार' आताच कुठे 'नाटककार' होऊ घातला होता. तानसेन हा संगीत सृष्टीतला एक चमत्कार ! अनेकांना अजूनही न उलगडलेला, आवाहन व आव्हान देणारा! भोबे यांचे ते होते एक सोनेरी स्वप्न ! "संगीत सम्राट तानसेन"– लेखक–गोपाळकृष्ण भोबे, सादरकर्ते गोवा हिंदु असोसिएशन. ठरले. मुहूर्तासाठी माणसे जांबावलीच्या दामोदराच्या पायाशी जातात काय, नाटक देवाच्या पायाशी ठेवतात काय, देवाचे भजन भोबे गातात काय, अस्वस्थ होतात काय आणि त्यातच त्यांचा अंत होतो काय ? देवाच्या दारी – पहिली वहिली नाट्यकृति घेऊन गेलेला हा साधक अखेर देवाचरणी समर्पित झाला. कलेला वाहिलेला हा रसिक पिंड अखेर ब्रह्मांडात विलीन झाला. त्याने फूल चढविले संगीत तानसेनचे आणि मग ही वीणा मूक झाली. गवई भोब्यांनी एक आगळी संगीत भेट देवाच्या पायी वाहिली. देव भाग्याचा आणि भक्तही भाग्याचा.

ही अपूर्व भेट घडली खरी. पण चटका लावून गेली.

अजूनही पटत नाही की गोपाळकृष्ण भोबे गेले आहेत. शुक्रवारी ते गोव्यात गेले. गुरुवारी रात्री स्टुडियोत आले. म्हणाले "ताबडतोब नाटकाचे पुस्तक काढायचे आहे. तानसेनचे मूळ चित्र आणून देतो. त्यावरून सुंदर मुखपृष्ठ तयार कर" तानसेन–तानसेन–तानसेन– भोबे तानसेनमय झाले होते. तानसेन लिहिले. पूर्ण केले. पाना पानावर उमटत होते ते केवळ शब्द नव्हते. तो ठिबकत होता उल्हास, आनंद आणि उमंगही ! भोबे यांच्या व्यक्तित्वाला आकार येत होता. डौल येत होता. आत्मविश्वासाचे नवे कोंभ फुटत होते. नव्या नाटकांच्या

पुढील पानावर










अनुक्रमणिका

कथावस्तु बोलावीत होत्या त्यांना. कथांचे धुमारे, मैफलींचे धुमारे, नाटकांचे धुमारे, व्याख्याने, वगैरे यांचे धुमारे फुटत होते. मैफलींचे बादशहा बोलावीत होते भोव्यांना—आत्मकथा सांगण्यासाठी – आणि अचानक —

**गोपाळकृष्ण भोबे गेले**

बैठक सरली. सूर म्लान झाले. श्रद्धा मूक झाल्या. डाव अर्धवट टाकून हा गडी देवाघरी निघून गेला आहे. चटका लावून निघून गेला आहे. असंख्य आठवणींची मनात गर्दी झाली आहे. भोबे हे दलाल आर्ट स्टुडियोत जडले-घडले. ह्या वास्तूशी त्यांचे नाते जे जडले ते त्यांच्या मृत्यूने तोडू म्हटले तरी तुटणार नाही. श्रद्धेने आलेले भोबे श्रद्धेनेच इथे रमले, वागले. चर्चा—वादविवाद—गप्पा—कथाकथन—हास्य-विनोद—सुखदु:खाचे प्रसंग अनेक. एकत्र आणणारी ओढ कायम. भोबे—दलाल हे नाते अशाच ओढीतून जन्म पावले. भोबे यांनी व्यक्तिरेखा लिहिल्या—कथा लिहिल्या, अग्रलेख लिहिले—स्फुटे लिहिली आणि शेवटी नाटकही लिहिले. त्यातल्या ओळीओळीतून आणि रंगारंगातून मला लाभली त्यांची श्रद्धा—प्रेम—जिव्हाळा. वास्तविक मी काय दिले त्यांना? दिलेले तसे पुरत नाही. पण पुरून उरते त्याला म्हणतात प्रेम— माया—जिव्हाळा, ओढ—श्रद्धा ! ! भोव्यांना माझ्यापाशी हे गवसले असले पाहिजे असे मला वाटते. ते येत राहिले. बोलत राहिले. फुलत राहिले. डुलत राहिले. गात राहिले. आणि "आरे येतां रे" असं म्हणून ते जे गोव्याला गेले ते पुन्हा आलेच नाहीत. मुंबईत सारे आयुष्य घडले. पण मृत्यूसाठी मात्र भोबे देवाच्या दारी गेले हा योग मला तरी अपूर्व वाटतो. भाग्याचा वाटतो.

भाग्य तरी कसं म्हणू मी ? ऐन उमेदीत भोबे होते. काळ भोव्यांचा होता. तो त्यांनी अखंड परिश्रम—मननातून मिळविला होता. आणि फुलांची फळे आकारत होती. आघात झाला. भोबे गेले. देवाचा 'महाजन' देवाघरी गेला! इहलोकीचा हा 'शापित गंधर्व' आपल्या स्वर्गलोकी निघून गेला !

भोव्यांना अनेक 'लौकिक' मर्यादा होत्या. पण त्यांची जिद्द अमर्याद होती. कष्ट घेण्याची ताकद मोठी होती. ईर्षा पेटलेला हा माणूस ऐन उमेदीत निघून गेला आहे ह्याचे दु:ख अपार आहे. शब्दांच्या पलिकडचे आहे. असंख्य आठवणींनी मनात गर्दी केली आहे. संगीताच्या मैफलीचे किस्से भोबे ऐकवीत आहेत. धूम्रवलये हवेत तरंगत आहेत. नव्या व्यथांच्या कथा होत आहेत. आणि मी त्यांना म्हणतो आहे "ह्याची झकास कथा होईल. लिहून टाक !" आणि मग भोबे अस्वस्थ होतात. ह्या अस्वस्थेतून भोबे नावाचा गोव्यातून आलेला एक तसा सामान्य माणूस थोर कलाकार, कथाकार, भाष्यकार झाला. भोव्यांचे खरे स्वप्न मात्र होते असामान्य चित्रकार होण्याचे. 'चित्रकार भोबे' हे स्वप्न अधुरे राहिले. "नाटककार भोबे" ह्या स्वप्नांचा पटही असाच क्रूर नियतीने उधळून टाकण्याचा प्रयत्न केला आहे. "नाटककार कै. गोपाळकृष्ण भोबे" हे बिरुद मनाला विद्ध करील हे खरे असले तरी 'तानसेन'च्या सुर-स्वर्गात ती व्यथा धुवून जाईल अशी माझी श्रद्धा ! परमेश्वर हा श्रेष्ठ नाटककार आहे हेच खरे. पण भोव्यांच्या आठवणीने मन व्याकूळ होते. मित्रा, किती रे ही घाई केलीस ?

**—दीनानाथ दलाल**

[पृष्ठ ७ वरून—अंगना तो . . . ]

भरल्या तोंडाने कौतुक केलेस. त्याला स्वत: घरोन् घर फिरून विद्यार्थी मिळवून दिलेस. आणि त्याची नुकसानी दामदुपटीने भरून दिलीस.

किशोरी, शोभा, मी किंवा जसराज एखाद्या बैठकीत वाईट गायलो तर आमच्यापेक्षा तू अधिक अस्वस्थ व्हायचा. "हे लोक असं कां करतात ?" असं येणाऱ्या जाणाऱ्याला विचारायचा. आम्हाला तुझ्या त्या धारदार लेखणीनं अंकुश मारायचा. जागं करायचा. समाधानाच्या भूलभुलैय्यातून चिमटे काढून भानावर आणायचा. आणि याचा परिणाम ! पुढल्या खेपेस आम्ही दुप्पट जोमानं मेहनत करून रियाज करून तुला गाणं ऐकवीत असू. मग तूहि आगळ्या धुंदीनं, मस्तीनं सगळ्या श्रोत्याना सांगत सुटायचा "ऐका, हे गाणं ऐका, आत्ताच ऐकून घ्या. कदाचित पुन्हा असे सूर लागणार नाहीत."

गोपाळबाब, कितीतरी लोक तुला ओळखू शकले नाहीत. आपल्याकडे हे असंच होत गेलंय. आणि होत राहील. तुझ्या रसीले-पणाला, सूर सूर टिपण्याच्या वृत्तीला, सच्चा सूर ऐकायला मिळाल्या-नन्तर तुझ्या डोळ्यातून येणाऱ्या अश्रूना आम्ही भाबडेपणा म्हणून दुर्लक्षिले. प्रसंगी हिणविले. अरे आमचं कामच हे !

मधु पेडणेकर गेल्यानन्तर "आता हार्मोनियम कुणाचा ऐकू" असं म्हणून ठाकूरद्वार ते मॅजेस्टिक सिनेमापर्यंत भेटले त्याला विचारणारा भोबे काय होता हे मी व माझे मित्र गायक आणि दीनानाथ दलाल तरी जाणू शकतात. निदान एवढं समाधान तरी तू मानशील ना ?

गुलामअलीना अर्धांग झाल्याचे ऐकल्यानन्तर कितीतरी दिवस या गोष्टीवर तुझा विश्वासच बसत नव्हता. संगीताच्या या अन-भिषिक्त सम्राटाला शारीरिक व्याधि होऊच शकणार नाही या एकमेव विश्वासाने तू स्वत:चे समाधान करून घेत होतास. आणि तुझा हा समज खोटा ठरल्यानन्तर ओक्साबोक्शी लहान मुला-सारखा रडणारा तू . . . मी पाहिलंय तुला . . . त्याना त्याहि परिस्थितीत रसिकानी आणि श्रोत्यानी ऐकावे व आर्थिक अडचणीनी या सम्राटाची शान खाली येऊ नये म्हणून म्युझिक सर्कलच्या चिटणिसांचे उंबरठे झिजविणारा तू. अरे तुझ्या या श्रमांचे काय चीज झाले ! आम्ही काय दिले तुला ? उपहास ! निंदा ! तुच्छता!

मराठी टीका वाङमयात सांगितिक टीकेला तू स्वरूप आणून दिलेस. तुझ्या संगीतावरील लेखांसाठी "महाराष्ट्र टाईम्स" विकत घेणारे वाचक मी पाहिलेत. तुला हे माहीत देखील नव्हतं किंवा

[पृष्ठ ६५ वर पहा]











# अंगना तो पर्बत भई

## –जितेंद्र अभिषेकी



My friend died, I don't remember, yesterday or day before! But what right he had to do so?

भोबे, तुलाहि हाच प्रश्न तूं जिथं गेलास तिथून शोधून काढून कां विचारू नये? गुलामअली खाँसाहेब आसन्नमरण आहेत असं समजल्यापासून तूं प्रत्येक देवळांपुढे उभा राहून "देवा, या सुरांच्या राजाला घेऊन जाऊ नकोस रे" "अरे, आमचा एवढासा आनन्दहि तुला पाहवत नाही ना?" असं विचारीत होतास.

भोबे, देवाजवळ नुसती तुझ्या बाबतीत एवढीशी मागणी करण्याची संधी देखिल आम्हाला तू दिली नाहीस ना? कां? कां?

सोमवारी भल्या पहाटे तू आलास, माझ्या हातातला तंबोरा घेऊन गाऊ लागलास... तुझ्या त्या रुंद आवाजात... गायकाच्या रुबावाने... "अब मोरी नय्या पार करो रे." अरे तुला कसली घाई झाली होती? अरे किनारा तर किती दूर होता. आत्ताच तर तुझी नाव या किनाऱ्यापासून निघाली होती. आत्ताच कुठं तिला वेग येऊ लागला होता. आम्हा गायकांची दुःखे, अपमान, मनस्ताप तानसेनच्या तोंडून तू चव्हाटयावर मांडणार होतास ना? का तुझ्या त्या "शापित गंधर्वा"सारखाच तूहि आमच्यावर रागावून निघून गेलास.

निषादाच्या बाणाने कृष्णाला अचानक मृत्यु आला. पण अर्जुन खांडववनाच्या आसपास कितीतरी वर्षे वेड्यासारखा फिरत होता, कृष्णाला शोधत. त्याला वाटे, कृष्ण जाणेच शक्य नाही. आज सकाळपासून मी तसाच फिरतो आहे. अन्यायाचा, अजागळ प्रवृत्तींचा आत्मसंतुष्टतेचा प्रतिकार आपण एकत्र येऊन केला. हे सुधारणंच शक्य नाही असं का वाटत होतं तुला? अरे आम्ही हे असेच. आम्हाला आजपर्यंत तुझी किंमत कळली नाही. आता कळू लागेल. तुझ्या जाण्यामुळे... तू मनस्वी होतास... हे देखिल आम्ही जाणतो... पण ते आम्हाला सातत्याने कळावं म्हणून तू आपलं अस्तित्वदेखिल पणाला लावलंस!

माझं गाणं ऐकून तू नेहमी म्हणायचा... "अजून खूपच करायचंय तुला...." तू ज्या दिवशी सर्वांगानं गाशील त्या दिवशीच माझी "दाद" तुला मिळेल. गोपाळकृष्ण, अरे आता कधी काळी हे घडलंच माझ्या हातून तर तुझी "वाहवा" न मिळालेले माझे गाणे यापुढेहि तसंच राहील.

गाण्यातला अनाघात आणि निमिषकाल तुला फार प्रिय होता. अनाघाती लपलेलं सुरांचं आणि तालाचं सौंदर्य तू बेहोष होऊन झेलायचा. निमिषकालातील मात्रेचा शतांश टिपण्यासाठी जीवाच्या आकांतानं तुझी धडपड चाले. तुझी ही धडपड पहाणाऱ्या इतर श्रोत्यांच्या बऱ्यावाईट उद्गारांचीही तू तमा बाळगली नाहीस... आणि ... आणि मृत्यूहि याच लयकारीनं स्वीकारलास! अनाघाती! निमिषकाली!

मराठी गायक जगन्मान्य व्हावा, भारतमान्य व्हावा असं तू नेहमी म्हणत होतास ना. मग आम्हाला तेवढी संधीही न देता निघून जाण्याचा तुला काय अधिकार?

आम्ही त्या लायकीचे नाही अशी तर तुझी खात्री झाली नव्हती ना? तू निराश झाला होतास का? पण तसं तू कधी बोललाहि नाहीस मला. आमची धडपड पाहून तू तर सुखावत होतास. जिद्द निर्माण करीत होतास. म्हणत होतास... गात रहा.. असाच गात रहा... एखाद्या क्षणी तुझी सेवा मान्य होईल आणि सूर सदेह उभे राहातील तुझ्यापुढे ... आता यापुढे मनाच्या उदास अवस्थेत हे कोण सांगेल आम्हाला? आम्हाला असे अर्ध्याच रस्त्यावर सोडून निघून गेलास ना? सोडायचंच होतं तर मग एवढी ओढ कां लाऊन ठेवलीस? तूंच मला सांगत होतास ना...

इंद्रधनुषके रंगों जैसी तक़दीर बदलती रहती है।
इन्सान वहीं रह जाता है तस्वीर बदलती रहती है ॥१॥
हम ठंडि हवामें कलियाँ है।

आणि हे सिद्ध करण्यासाठी एवढी मोठी किंमत आम्हाला द्यायला लावलीस आणि तूहि दिलीस.

परवाच तू घरी येऊन मला म्हणालास "मी चांगलं लिहिलं की, हे गायक "महाराष्ट्र टाईम्स"चा अंक घेऊन प्रत्येकाला दाखवीत फिरतात आणि जरा कुठं वाईट लिहिलं, दोष दाखवून दिले, चुकांवर बोट ठेवलं की हेच गायक "भोबेना काय कळतं" म्हणतात...

आम्ही गायक असेच असतो. गायकच का प्रत्येक माणूस हा असाच असतो. तू मात्र या गोष्टी फार मनाला लावून घेत होतास.

मला आठवतं, एका वाद्यवादकावर तू टीका केलीस आणि तुझी टीका वाचून या वाद्यवादकाच्या विद्यालयातील बरेच विद्यार्थी विद्यालय सोडून गेले. मला ही गोष्ट ज्या दिवशी कळली त्या दिवशी तू त्या कलावंताची भेट घेतलीस आणि पुन्हा त्या वादकाचा कार्यक्रम स्वकष्टाने घडवून आणलास आणि त्याच्या योग्य गुणांचेहि तेवढ्याच

[पृष्ठ ६ वर पहा]











अनुक्रमणिका

## खुसखुशीत विनोदी कथा




**ऑफिसमधून** दमून भागून आल्यानंतर गरम चहाचे घुटके घेत आरामखुर्चीवर आरामात पडावं आणि रेडिओवरील संगीत ऐकावं हे माझं आवडतं स्वप्न. पण रेडिओ ही अशी विलक्षण चीज आहे की ज्यावेळी जे नेमकं तुम्हाला नको असेल तेच तुमच्यासमोर ठेवण्यात रेडिओवरील अधिकारीवर्ग झटत असतो. माझा एक मित्र विनोदाने नेहमी म्हणतो, 'आकाशवाणी ही तुझी कहाणी, रटाळ भाषणं जुनाट गाणी!'

अगदी खरं आहे ते! गाणं ऐकण्याचा मूड यावा आणि रेडिओचा कान पिरगळावा तर त्यातून 'पितृदेव मरण पावल्यासारख्या' खिन्न आवाजात 'भारतीय संस्कृती' किंवा 'आमची तीर्थक्षेत्रे' असल्या भयानक विषयांवरचं विद्वज्जड व्याख्यान ऐकावं लागतं. एखादी गंभीर घटना घडल्याचं ऐकावं. खात्री करून घेण्यासाठी रेडिओ सुरू करावा, तो १९४० साली गाजलेली आणि आता गंजलेली भावगीतं कानावर पडायचीच!

बरं, या जुन्या ध्वनिमुद्रिका तरी धड असाव्यात! तर तेही नाही. काही काही ध्वनिमुद्रिका तर रेडिओ अधिकाऱ्यांप्रमाणेच हट्टवादी असतात. त्या एखाद्या शब्दावरून पुढे सरकायलाही राजी नसतात. मग 'राऽऽऽऽधा खुर्रर्र राऽऽऽऽधा खुर्रफुट् राऽऽऽधा सुईऽऽऽऽऽ राऽऽऽधा' असला प्रकार सहन करावा लागतो. एवंच 'असून अडचण नसून खोळंबा' या प्रकारात रेडिओ ही चीज आजकाल मोडू लागली आहे.

आज ऑफिसातून आल्यानंतर मोठ्या आशेने रेडिओ सुरू केला. आणि प्रथमग्रासे मक्षिका नव्हे चांगला 'मत्स्यपात' झाला. कुणाचा तरी नाकातला गेंगाणा आवाज कानावर आला. 'भारतीय प्रगतीचा आढावा' या विषयावर कुणीतरी आवाज शक्यतो नाकाबाहेर येऊ न देण्याची खटपट करीत बोलत होता. वक्त्याच्या भाषणातील 'अमुक टक्के' 'तमुक टक्के' या भाषेवरून ते महाशय विद्यार्थी जगतात. 'टक्के टोणपे' खाल्लेले प्राध्यापक असावेत हे लक्षात येत होतं.

रेडिओ चालू करून मी आरामखुर्चीत ऐसपैस पसरलो असल्यामुळे त्या भाषणाचा 'गळा घोटण्याची' इच्छा वारंवार होत असूनही मी तसाच पडून राहिलो. भाषणाकडे लक्ष देण्याचा प्रश्नच नव्हता. पण वक्त्याच्या शेवटच्या दोन तीन वाक्यांनी मात्र माझं मन आकर्षित करून घेतलं. वक्ते सांगत होते—'बहुसंख्य भारतीय जनता खेड्यात राहते. हे खेडुत अत्यंत पापभीरू, सरळ, साधेभोळे असतात. त्यांचा उद्धार हाच भारताचा उद्धार.'

वक्त्यांच्या या वाक्यांनी मात्र मला खळखळून हासू फुटलं. किती केलं तरी पुस्तकी ज्ञान! कदाचित् शिकलेल्या लोकांच्या वाईट अनुभवावरून त्याच्या विरुद्ध लक्षणांचे त खेडुत असावेत, असा काहीसा प्रकार वक्त्याच्या विचारांच्या बाबतीत झाला असावा.

खेडुत हा शहरी माणसापेक्षा, पुस्तकी शिक्षण आणि साहेबी कपडे. या गोष्टी सोडल्यास, कुठल्याही बाबतीत कमी नसतो असं माझं ठाम मत बनलं आहे. वरून भोळाभाबडा दिसणारा खेडवळ माणूस आपल्या भाबड्या चेहऱ्याचं भांडवल करून मी मी म्हणणाऱ्या चांगल्या शहाण्यांना कधी मूर्ख बनवील याचा नेम नसतो. उगीच काही तरी सांगत नाही. माझा स्वतःचाच अनुभव आहे हा.

मागल्या वर्षाचीच गोष्ट आहे. कॉलेजच्या शेवटच्या वर्षात शिकत होतो आम्ही. 'यावर्षी सगळ्या टी. वाय्. बी. ए. च्या विद्यार्थ्यांनी एक दिवस कुठे तरी सहलीला जावं आणि तो दिवस परपस्पर सहवासात काढावा' असा विचार मन्या सहस्रबुद्धेने व्यक्त केला. नाही तरी कॉलेजच्या चार वर्षांत म्हणावा तसा 'परस्पर सहवास' न घडल्याने वैतागलेल्या मुलींनी मन्याची कल्पना

अनुक्रमणिका

चांगलीच उचलून धरली. वर्गात मी सगळ्या मुलांत जरा वयाने मोठा व नोकरी करणारा विद्यार्थी असल्याने या सहलीची संपूर्ण आंखणी मी करावी असं ठरलं. मीही अर्थातच मोठ्या आनंदाने माझ्यावर टाकलेली जबाबदारी पार पाडण्याच्या खटपटीस लागलो.

पण दोन दिवसातच या पुढारीपणाचा खरा इंगा मला समजला. चार विद्यार्थी एकत्र आणणं आणि त्या सगळ्यांचं एखाद्या विषयावर एकमत घडवून आणणं ही गोष्ट किती कठिण आहे याचा अनुभव मला आला. सहलीच्या दृष्टीने प्रेक्षणीय स्थळाला विद्यार्थी—जगतात. शून्य किंमत होती. आपल्या वर्गातील कोणकोणती 'प्रेक्षणीय स्थळं' सहलीस येणार आहेत या गोष्टीला त्यांच्या मते फार किंमत होती. 'चांगली चांगली लोकप्रिय स्थळं' येणार असतील तर मात्र जहन्नम्‌मध्येही येण्यास त्यांची तयारी होती.

निश्चित किती मुलं सहलीत भाग घेणार हे मला काही केल्या समजेना. मुलांना गाठून 'कुठे जायचं' हे विचारावं तर त्यांचा प्रश्न 'कोण कोण येणार आहेत?' आणि मुलांना एकदाचं निश्चित सांगण्यासाठी मुलींना विचारावं तर त्या 'कुठे जायचं' हे विचारीत. म्हणज कोणत्या मुली येणार हे समजल्यावांचून सहलीचं ठिकाण ठरेना आणि सहलीचं ठिकाण ठरल्यावांचून मुली काही सांगेनात. हा तिढा सुटता सुटेना. सहलीचं गाडं काही पुढे सरकेना.

मी सहलप्रमुख म्हणून सगळी जबाबदारी माझ्यावरच! मुलं आपल्या येण्यावर अवलंबून आहेत हे न ओळखण्याइतक्या मुली दुधखुळ्या नव्हत्या. त्या भाव खाऊ लागल्या. मंदा पानसेला मोटार लागते. तेव्हा आगगाडीने जाण्यासारखी ठिकाणं असतील तरच ती येणार. मंदा पानसेचं हे विधान ऐकल्याक्षणापासूनच दहा बारा जणांना मोटार हा शब्द उच्चारताच चक्कर येऊ लागली. उलट नंदा सोनकरच्या मते आगगाडीचा प्रवास



म्हणजे 'शी, मेला अगदीच डल्!' आगगाडीपेक्षा मोटारचा प्रवास तिला 'काही तरी थ्रिलिंग' वाटतो. हे ऐकताच काही मुलांना मोटरच्या प्रवासातच खरी गंमत असल्याचा शोध लागतो.

शोभा नाडकर्णी स्पोर्ट! तिला मोटार, आगगाडी असल्या वाहनांचा मनस्वी तिटकारा. 'सहलीला जावं तर सायकलवरच' असं तिचं स्पष्ट मत पडलं. मग अर्थातच कॉलेजच्या चढावावरून सायकल दामटताना तोंडाला फेस येणारी पोरटीही सायकलप्रवासाची तळी उचलून धरू लागली.

मुलांची ही तऱ्हा, तर प्राध्यापकवर्गाची दुसरीच! प्रा. दांडेकर येणार असतील तर प्रा. नवाथे येणे अशक्य. प्रा. नवाथे येणार असतील तर प्रा. देवांना विचार करावा लागणार. प्रा. भिडयांना सहली (फिहली) म्हणजे वेळेचा अपव्यय वाटतो. तरुण प्राध्यापकाना 'नाजुक' आवाजातल्या विनंतीची अपेक्षा असते. माझ्यासारख्या मिशाळ बाप्याला ते समोर उभे राहू देईनात.

असा गोंधळ सतत पंधरा दिवस चालला होता. मी पुरा वैतागून गेलो होतो. आता हा प्रश्न 'प्रेस्टिज पॉईंट' झाला. कॉलेजच्या विश्वात कुठला प्रश्न 'प्रेस्टिज पॉईंट' होत नाही म्हणा! प्राध्यापकवर्ग आपल्या प्रतिस्पर्धी प्राध्यापकाला टाळून मुलं आपल्यालाच बोलावतात की नाही, या विचाराने अस्वस्थ झाला होता. कुणा प्राध्यापकाला बोलवावं हा मला प्रश्नच पडला. शेवटी मी सगळ्यांनाच आमंत्रण दिलं. आणि साहजिकच कुणीच सहलीत सहभागी होणार नाही हे जवळ जवळ निश्चित झालं.

मंदा, नंदा आणि शोभा या तिघीही आपणच सुचविलेल्या वाहनाने प्रवास झाला

*शोभानं मुकाटयानं डबा उघडा केला....पाच मिनिटात अगदी विल्हेवाट लागली आणि आमची भुकेनं वळवळणारी आतडं पोटातल्या पोटात अक्षरशः उलटी पालटी झाली....आमच्या वाटयाला काही म्हणजे काही एक शीत सुद्धा आलं नाही.*








पाहिजे अशा हट्टास पेटल्या. जिने सुचविलेलं वाहन मान्य होईल ती वर्गाची 'अनभिषिक्त राणी' ठरणार या विचाराने तिघीही झपाटल्या होत्या. तिघींचे पाठीराखे तरुण फोडण्याच्या कामाला लागले. आणि हा हा म्हणता एखाद्या निवडणुकीप्रमाणे साम दाम दंड भेद हे प्रयोग होऊ लागले. त्यातल्या त्यात शोभा नाडकर्णीने चांगली आघाडी मारली. एखाद्या मंत्र्याच्या कार्यकर्त्यांप्रमाणे शोभाच्या ग्रुपने मुलांना वाटेल ती आश्वासनं देण्याचा सपाटा लावला. त्यापैकी प्रमुख आश्वासन म्हणजे सायकलवरून सहलीस येताना शोभा अर्धी चड्डी आणि तंग गंजिफ्रॉक या पोषाखात येणार होती. आता या मोहाला बळी न पडेल असा शुक्राचार्य कॉलेजविश्वात कसा सापडणार?

शेवटी बहुमताने सायकलची सहल निश्चित झाली. शोभा खुशीत होती. कुणाच्या सोटचाने का होईना पण साप मारला गेला म्हणून मी सुटकेचा निःश्वास सोडला. तोच पुन्हा दुसरा प्रश्न उपस्थित झाला. सायकलवरून जायचं हे तर ठरलं. पण जायचं कुठे? कुठलंही ठिकाण सुचवा, ते कुणी ना कुणी तरी नुकतंच पाहिलेलं असायचं. मंदा व नंदाचे पाठीराखे प्रत्येक सूचनेला कोलदांडा दाखवू लागले. लोकशाही सरकार वर्षानुवर्षे चालवणाऱ्या काँग्रेस सरकारचं मनोमन कौतुक करीत मी दूर जाऊन बसलो.

पण पुन्हा शोभा नाडकर्णीने आपलं कौशल्य पणास लावले. तिने मुलांना नवीन काय आश्वासन दिलं कुणास ठाऊक पण सगळी मुलं लोणावळ्यापर्यंत सायकली पिटाळायला तयार झाली. लोणावळ्याचं नांव ऐकताच कॉलेजच्या चढावावर धापा टाकणाऱ्या काही हुशार मुलांनी 'झाकली मूठ' बरी या विचाराने माघार घेतली. मंदा नंदा ग्रुपची मुलं निषेध म्हणून कटाप झाली. मुलींपैकी दात पुढे असणाऱ्या, वर्णभेदाने चकाकणाऱ्या, दृष्टियंत्रात बिघाड झालेल्या अशा लक्षणांनी युक्त अशा १३–१४ मुली मोठ्या आशेने सहलीस येण्यास तयार झाल्या.

अशा रीतीने सहलीचा दिवस एकदाचा ठरला. प्रा. सान्यांनी शोभातर्फे मोठ्या शहाणपणाने आमंत्रण मिळवलं. तिला पाहताच त्यांनी विचारलं,

'काय मिस् नाडकर्णी, कोण कोण येतंय् ट्रिपला?'

'तुम्ही चला ना सर.' शोभाने देखल्या देवा दंडवत केला. पण हे ऐकताच 'सर्टनली, जरुर जरुर' असं अत्यंत आनंदाने पुटपुटत साने स्टाफ रूमकडे पळाले. 'आपल्याला स्वतः शोभाने विनंती केल्यामुळे ट्रिपला जावंच लागणार' असं त्यांनी प्रत्येक प्राध्यापकाला सुनवलं. तरुण प्राध्यापकात नैराश्य पसरलं. साने स्टाफरूममधून बाहेर पडताच 'सान्यांना 'मॉरल सेन्स' कमी असल्याचा 'शोध' एका 'द्राक्षे आंबट' जातीच्या प्राध्यापकाने लावला. सगळ्यांनी त्याला दुजोरा दिला.

माझ्याजवळ २५ मुलं, १५ मुली आणि प्रा. साने अशा ४१ जणांची यादी तयार झाली. सायकलींमुळे वर्गणी वगैरे जमवण्याचा ताप नव्हता. प्रत्येकाने रविवारी पहाटे ४॥ वाजता हिंदविजय, टॉकीजपाशी जमावं असं ठरलं. सगळी मुलं जमल्यानंतर प्रा. सान्यांच्या जंगली महाराज रोडवरील घरावरून जाताना त्यांना घेऊन पुढे जायचं ठरलं. ऊन कडक होण्याच्या आत लोणावळा गाठण्याचा आमचा विचार होता.

मी सहलप्रमुख असल्याने अत्यंत जपून वागत होतो. आपल्यामुळे उगीच 'फट् म्हणता सहलहत्या' होऊ नये म्हणून मी काळजी घेत होतो. मी मध्यरात्री २॥ वाजताच उठलो आणि सर्व आवरून पहाटे चारलाच हिंदविजय सिनेमापाशी येऊन बसलो. ४॥ झाले ५–५॥ झाले, पण तिथे मी सोडून अक्षरशः कुत्रंही फिरकलं नाही. मी आपला जांभया देत, चुटक्या वाजवीत एखाद्या भुतासारखा उभा होतो.

६॥ वाजले. सगळीकडे उजाडलं.

* पान ५९ वर पहा *












मुलींचे लग्न, मुलांचे शिक्षण
किंवा स्वतःचे घर यांपैकी कोणतीही
समस्या असो; तिचे सोपे उत्तर म्हणजे
**संचित मुदतीच्या ठेवीचे खाते.**

१. टपाल कचेरीत दरमहा ठराविक रकमेची (पाचाने विभाज्य) रु. ३०० पर्यंत, ५, १०, अथवा १५ वर्षे ठेव ठेवीत चला. तुम्हांला पाहिजे असलेली ठोक रक्कम त्यापासून मिळेल (ठेवी व करमुक्त व्याज मिळून).
२. १० व १५ वर्षे मुदतींच्या खात्यांतील ठेवी कर आकारणी करताना एकूण करपात्र उत्पन्नांतून वजा केल्या जातात.
३. ह्या ठेवींवर संपत्तीकरही माफ असतो.

# समस्या सुटली...

**संचित**
**मुदतीच्या**
**ठेवीचे खाते**

*आजच नजीकच्या टपाल कचेरीत उघडा.*



**राष्ट्रीय बचत संघटना**

davp 67/395





अनुक्रमणिका



क्रुश्चेव हेअर कटिंग सलूनचे श्री. साजिंदे



धी विनोबा चप्पल मार्टचे मालक श्री. पादत्राणे

धी दिगंबर टेलरिंग फार्मचे मालक श्री. फडके टेलर





श्री कालीमाता न्यू आरोग्य भुवन आणि लॉजिंग बोर्डिंगचे मालक श्री. स. दा. पोटभरे

**प्रेम** कसे करावे? या विषयावर धी न्यू हनुमान वादविवाद उत्तेजक मंडळाच्या वतीने सहकारमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली नुकताच एक अभिनव परिसंवाद आयोजीत करण्यात आला त्याचा अहवाल येथे थोडक्यात देण्याचा विचार आहे. या परिसंवादाला 'अभिनव' म्हटले ते केवळ एक टूम म्हणून किंवा एक लिखाणाची लकब म्हणून नव्हे. सदर परिसंवाद खरोखरच अभिनव होता. बहुधा परिसंवादाचे विषय किचकट, रुक्ष आणि लोकांच्या डोक्यावरुन जाणारे असतात. परंतु परिसंवादाला असा किचकट विषय न निवडता प्रेमासारखा सर्वप्रिय आणि सर्वमान्य विषय मंडळाने निवडला यातच त्याचे अभिनवत्व दिसून आले. तसेच प्रेमासारख्या नाजुक विषयावरच्या परिसंवादाचे अध्यक्षस्थान सहकारमंत्र्यांना देऊन मंडळाने आपल्या अभिनवत्वात भर घातली. . . पण. . . मंडळाचे अभिनवत्व पुढेच आहे. सामान्यतः किचकट विषयावरच्या परिसंवादात भाग घ्यायला विद्वान, प्राध्यापक, लेखक, राजकीय पुढारी, प्रसिद्ध कलावंत इत्यादी लोकांना बोलावण्यात येते. परिसंवादात भाग घेण्याची या लोकांची मक्तेदारी मोडून काढण्याचा मंडळाने धाडसी प्रयत्न केला आणि मंडळाने नित्याच्या व्यवहारातल्या व्यवसायी लोकांना या परिसंवादात भाग घेण्याचे पाचारण केले. अशा तऱ्हेचे धाडसी अभिनवत्व दाखवून प्रेमावर बोलण्याचा लेखक, तत्वज्ञानी, कलावंत इत्यादी लोकांचाच फक्त मक्ता आहे या प्रचलीत कल्पनेला मंडळाने सणसणीत धक्का दिला आणि प्रेम या सनातन आणि तरीही नित्यनूतन विषयावर समाजातील अगदी खालच्या थरातील लोकांचे विचार ऐकण्याची श्रोत्यांस संधी दिली. व्यापाऱ्यांनी मंडळास फक्त एकच अट घातली होती की त्यांची दुकाने रात्रौ नऊला बंद होतात तरी परिसंवादाची वेळ रात्रौ नऊनंतरची असावी. मंडळाने त्यांची विनंती मान्य केली आणि हनुमान हॉलमध्ये रात्रौ नऊ ते बारापर्यंत 'प्रेम कसे करावे?' या विषयावरचा परिसंवाद प्रेमिकांच्या प्रेम-

राजा राजवाडे

संवादासारखाच खूप रंगला. तेव्हा सदर परिसंवादात वक्त्यांनी जे काही विचार मांडले ते येथे संक्षिप्त स्वरुपात देण्यात येत आहेत.

श्री. क्रुश्चेव्ह हेअर कटींग सलूनचे मालक श्री. साहेबराव उदाजी साजिंदे काय बोलले ते वाचा— साजिंदे म्हणाले,

"खरं म्हणजे प्रेम कसे करावे? या विषयाचा नि माझा केसाइतकाही संबंध नाही. वास्तविक 'केस कसे कापावे?' या विषयावर मला भाषण देण्यास सांगणे जास्त योग्य ठरले असते. परंतु मंडळाची कार्यकर्ती मंडळी माझी नेहमीची गिऱ्हाईके असल्याने त्यांच्या विनंतीला नकार देणे मला शक्यच नव्हते. कारण त्यामुळे कदाचित माझे गिऱ्हाईक तुटले असते. असो, अर्थात् मी कार्यकर्त्यांच्या आग्रहाच्या कात्रीत सापडलो आणि आता प्रेम कसे करावे? या विषयावर माझे विचार मांडण्यासाठी आपल्यापुढे मी उभा आहे.

"तसे पाहिले तर माझे लग्न हे इंडियन कटाप्रमाणे साध्या पद्धतीने झाले आहे. मी बायकोवर प्रेम करण्यापेक्षा तिला मारझोडच जास्त केली आहे. हे जरी खरे असले तरी माझ्या सलूनात फिल्मफेअर, उर्वशी, फिल्मी दुनिया, इत्यादी अनेक वृत्तपत्रे वाचून मलाही प्रेम या विषयात थोडेफार कळू लागले आहे. माझा नि प्रेमाचा मघाशी सांगितल्याप्रमाणे केसाइतकाही संबंध नसला तरी प्रेमाचा नि केसांचा फार जवळचा संबंध आहे! एखादे गिऱ्हाईक रोज गुळगुळीत आणि उलटी दाढी करून घेऊ लागले की खुशाल समजावे की ते गिऱ्हाईक प्रेमात पडले आहे! यालाच 'प्रेमाची उलटी तऱ्हा' म्हणत असावेत! (हंशा) प्रेमात पडलेल्या पुरुषाला गाला-

वर दाढीचे खुंट ठेवून भागत नाही. कारण ते खुंट जर त्यांच्या प्रेयसीच्या गालाला टोचले तर प्रेयसीचे तिच्या या प्रियकरावरचे प्रेम तिच्याच कपाळावरील बटांप्रमाणे उडून जाते! शिवाय हल्ली निरनिराळ्या तऱ्हेचे सुगंधी साबण मुली वापरत असल्याने त्यांची त्वचा 'नरम आणि मुलायम' बनत असते आणि त्यामुळे त्यांना प्रियकराच्या दाढीचे खुंट जास्तच बोचतात. म्हणून प्रियकराला घोटून दाढी करून घेण्यावांचून गत्यंतरच नसते. हे दाढीबद्दल झाले. आता डोकीवरच्या केसाकडे वळू. मी एकदा एका तरुण गिऱ्हाईकाचे दिलीपकुमार टाईपचे केस चुकून बारीक केले. दुसऱ्याच दिवशी तो तरुण गिऱ्हाईक तणतणत माझ्या दुकानात आले नि म्हणाले, "तुम्ही माझ्या प्रेमालाच कात्री लावली आहे!" मी न समजून विचारले, "म्हणजे काय?" रडवेल्या स्वरात गिऱ्हाईक म्हणाले, "काल तुम्ही रेडिओ सिलोन ऐकण्याच्या नादात माझे दिलीपकुमारकट केस माफ बारीक केलेत. माझी प्रेयसी खरं म्हणजे माझ्या दिलीपकुमार कट प्रेमावरच भाळली होती. ते केस तुम्ही कापल्यामुळे तिचे माझ्यावरचे प्रेम, माझ्या डोक्यावरच्या केसाप्रमाणेच साफ कमी झाले आहे! (हंशा) यावरून स्पष्ट होते की न्हाव्याच्या हातात गिऱ्हाईकाचे केवळ डोकेच नसून त्याचे गुप्त प्रेमप्रकरण देखील असते! (हंशा आणि टाळ्या) हिन्दी सिनेमावाले प्रेमात पडलेल्या नायकाची दाढी नि केस कधी कधी वाढलेले दाखवितात ते न्हाव्याच्या भीतीनेच असावेत. आता प्रेम कसे करावे? याबाबत काही विचार मांडतो—

"सुरूवातीसच सांगतो की प्रेमवीराची भाषा न्हाव्याच्या भाषेसारखीच गोड असली पाहिजे! (हंशा) रविवारी दुकानात वीस नंबर असले तरी आम्ही नव्या गिऱ्हाईकांचे 'या साहेब' या गोड शब्दानीच स्वागत करतो. तसेच प्रेम करणाऱ्या माणसाने आपल्या प्रेमपात्राचे स्वागत, कितीही कामे असली तरी गोड भाषेतच केले पाहिजे. आपण पाहिले असेलच, आमच्या सलूनातून निरनिराळे परदेशी कट दाखविणाऱ्या माणसांचे फोटो लावलेले असतात. ते कट आमचे आदर्श असतात. वास्तविक त्या कटाबरहुकूम आम्ही कधीच केस कापीत नाही. पण त्याकडे बघता बघता गिऱ्हाईक खूष होते. व आपले केसही तसेच कापले जाणार आहेत या विचाराने गिऱ्हाईकाला संतोष वाटतो. प्रेम करणारानेही आपल्या घरात रामसीता, लैलामजनू, शहाजहान-मुमताज, बाजीराव–मस्तानी, दिलीप–वैजयंतीमाला आदीच्या प्रेमाच्या आदर्शाचे फोटो घरात लावून प्रेम करावे म्हणजे या आदर्शातल्या जोडीतील प्रेमवीराप्रमाणेच आपला प्रियकर आपल्यावर प्रेम करीत आहे असा समज होऊन भोळी प्रेयसी खूष होते आणि प्रेम करून झाल्यावर, केस कापून झाल्यावर आरसा दाखविल्यावर, गिऱ्हाईक जसे निर्बुद्ध नवऱ्याप्रमाणे, समाधानाने मान हलविते, तशीच प्रेयसीही समाधानाने मानेला प्रेमळ झटके देते. तसेच आम्ही जसे पाण्याचे फवारे गिऱ्हाईकाच्या नाकातोंडावर मारून त्याला गुदमरवून टाकतो, त्याप्रमाणे प्रेमाच्या वर्षावाने प्रेयसी प्रियकराला गुदमरवून टाकते. प्रेम ही दाढी करण्यासारखी कठीण नि धोकेबाज कला आहे! (हंशा) या दोन्ही कला घसमुसळेपणाने साध्य करू गेल्यास रक्तपात होतो! (टाळ्या) दाढी जशी पूर्ण वाढ झाल्यावर केल्यासच दाढी केल्याचे समाधान लाभते तसेच दोघांच्या मनात परस्पराबद्दलच्या प्रेमभावनेची पूर्ण वाढ झाल्यावरच प्रेम करण्यात मजा असते. नाहीतर प्रेमभावना नसताना केलेले प्रेम आणि धार नसलेल्या वस्तऱ्याने केलेली दाढी दोन्ही एकच! दोघांचाही परिणाम 'आग' पेटविण्यातच होतो! (हंशा) दाढी जशी एकदा करून संपत नाही तसेच प्रेमही एकदा करून संपत नाही. उलट दाढीप्रमाणेच प्रेमही केल्यानेच वाढते (हंशा नि टाळ्या).

"प्रेमातला दुसरा नियम असा की प्रेमिकांची भाषा स्पष्ट पाहिजे. संदिग्ध नको. आमची काही काही गिऱ्हाईके आम्ही केस कसे कापू असे विचारल्यावर सांगतात 'कसेही कापा' आणि मग डोक्यावरून 'झीरो' मशीन फिरल्यावर गिऱ्हाईकाचे होते तसेच कसेही केल्याने प्रेमाचे उत्तर 'झीरो' म्हणजेच शून्य होते. अशा प्रेमवीरानाच मला वाटते नेहमी कवी सांगतात तसले 'शून्य शून्य' वाटत असावे! (प्रचंड टाळ्या)"

"केस कापणे म्हणजे केसाचा त्याग करणे. प्रेमातही त्यागाला महत्त्व असते. आणि हा त्याग प्रेयसीचा हॉटेल सिनेमाचा अलोट खर्च करून प्रियकर नेहमीच करीत असतो. (हंशा) तसेच केसाप्रमाणे प्रेमही प्रमाणाबाहेर वाढू देऊ नये. त्यामुळे प्रेमात गुंता निर्माण होतो आणि मग डोक्याला नसता त्रास होतो. म्हणून प्रेमिकांनी प्रेमही केसाप्रमाणे माफक ठेवावे अशी अखिल प्रेमवीराना सर्व केशकर्तनकारांच्या वतीने मी विनंती करतो आणि माझे भाषण संपवितो."

श्री. साळिंदे यांच्या भाषणानंतर "धी विनोबा चप्पल मार्ट"चे मालक श्री. पादत्राणे उभे राहिले आणि त्यांनी भाषणास सुरुवात केली. ते म्हणाले,

"बंधु भगिनींनो, चपलेशी नित्य संबंध असल्याने मी आपणास सांगू इच्छितो की चपलेचा नि प्रेमाचा फार जवळचा संबंध आहे. आणि हे जाणूनच मला वाटते मंडळाच्या संचालकांनी मला, इथे

# प्रेम कसे करावे








भाषण करायला बोलाविले असावे. प्रेयसीच्या गालाचा स्पर्श व्हायच्या आधी तिचे चप्पलच गालात बसावयाची हा मला वाटते प्रेमाच्या राज्यातला अलिखीत नियमच झाला आहे! पूर्वीच्या काळी कामच्या धंद्यातल्या लोकांना चपला फाडणाऱ्या वधूपित्यांच्या आणि मध्यस्थांच्या चपलांचे रिपेरिंग करण्याचे खूप काम मिळत असे. परंतु हल्ली प्रेमविवाहाचे प्रमाण वाढले असल्याने तरुणींच्या चपलांचे रिपेरींग करण्याचे जास्त काम मिळू लागले आहे. तेव्हा चपला आणि प्रेम याचा फार निकटचा संबंध असतो हे निदान तरुण श्रोते तरी निःसंशयपणे मान्य करतील अशी मला आशा आहे! (हंशा आणि टाळ्या)

"माणसाने प्रेम करून त्यांचे लग्नात रूपांतर झाले की जोडप्याला 'जोडा' या नावाने ओळखण्यात येते. 'जोडा दाखविणे' जरी असभ्यपणाचे असले तरी 'जोडा शोभणे' मात्र भूषणावह मानतात! 'जोडा' या शब्दातही दोन हृदये जोडण्याचा आदेश अंतर्भूत आहे ! (टाळ्या) 'जोडा' हे मीलनाचे प्रतीक आहे. एकाशिवाय दुसऱ्याला अर्थ नाही. एक नसला तर दुसऱ्याचे अडते. दोन चपला असल्या तर चालता येते. तसेच दोन प्रेमिक माणसे—म्हणजे एक स्त्री आणि एक पुरुष अशी दोन माणसे असल्याशिवाय माणसाला जीवनाची वाटचाल करता येत नाही. जोडा फाटतो तसे प्रेमही फाटते. परंतु त्यालाही तडजोडीची




शिवण घालणे जरूर असते. हल्ली जोडयाच्या खोटेत काही लोक भुसा किंवा पुठ्ठा भरतात. तसेच कधी कधी प्रेमातही स्वार्थाचा नकली भुसा भरलेला असतो. तेव्हा सावधगिरी बाळगणे अगत्याचे आहे. जोडयाप्रमाणेच प्रेमपात्रही पूर्ण तपासून घेतले पाहिजे! दोन्ही बाबतीत 'फिटनेस' पाहिला पाहिजे!

जोडयाला चुका मारणे चांगले नव्हे. जोडा झिजला की त्या वर येऊन पायाला टोचतात. प्रेमिकांनीही प्रेमात 'चुका' होऊ देऊ नयेत. त्या टोचतात. विशेषतः प्रेम झिजल्यावरच त्या जास्त सलू लागतात. व मनुष्य दुःखी होतो. जोडा फाटलेला असला तरी तो तसाच फरफटत नेण्याची काही जणांची पद्धत असते. ते लोक योग्य वेळी मोच्याकडून शिलाई मारून घेत नाहीत. योग्य वेळी शिलाई मारली तर जोडा जास्त टिकतो. प्रेमाचे पण तसेच आहे. प्रेम कुठे तुटते आहे असे वाटताच त्याला जर समजूतदारपणाची शिलाई मारली तर प्रेम जास्त टिकते व माणसाची 'चाल (चलणूक!)' बिघडत नाही (हंशा). काही काही लोक जोडा नवीन घेतल्यावर फक्त एकदाच पॉलीश करतात व मग पुढे तो साफ फाटेपर्यंत त्याकडे लक्ष देत नाहीत. काही काही प्रेमवीरही लग्नानंतर प्रेम करायचे विसरतात. आणि त्यामुळे त्यांचे जीवन बिनपॉलीशच्या बुटासारखे मळकट होते. म्हणूनही प्रेमाला पॉलिशची आवश्यकता आहे. प्रेमाला नव्या नव्या प्रेमाचे पॉलिश करणे आवश्यक असते. त्यामुळे जीवन चकाकत रहाते.

प्रेमात सफलता मिळवायची असेल तर त्यात चांभाराची एकाग्रता आणि चवकसपणा हवा! (हंशा) चांभाराची दृष्टी चपलेवर तशी प्रेमिकांची दृष्टी आपल्या प्रेमपात्रावर असायला हवी! चांभार चौकशा करणे इतर बाबतीत आक्षेपार्ह असले तरी प्रेमिकांनी चांभार चौकशा केल्याशिवाय आपल्या प्रेमपात्राबद्दल खरी माहिती कळत नाही व फसवणूक होते. म्हणून प्रेमिकांनी चांभारासारखे चवकस असल्यास फसण्याचा चान्स कमी. चप्पल नवी असल्यावर जसा घसरून पडण्याचा धोका असतो तसाच नव्या प्रेमिकाना घसरून पडण्याचा धोका असतो. कारण नवी चप्पल घातल्यावर घसरून पडल्यास फार तर हाडच मोडते. पण नव्या प्रेमात एकदा का घसरून पडले की माणसाला पुन्हा उभे रहाणे शक्य होत नाही. तेव्हा प्रेम आणि चप्पल याचा हा असा संबंध आहे. चप्पलच माणसाला प्रेम कसे करावे? याचे नेहमी धडे देत असते. म्हणूनच मी ठासून म्हणू इच्छितो की प्रेम ही प्रेमिकाना जेवढी पूज्य गोष्ट वाटते तेवढीच चप्पलही पूज्य वाटली पाहिजे. कारण चप्पल ही प्रेमिकांची स्फूर्तिदेवता आहे. तेव्हा प्रेम कसे करावे? असे मला कुणी विचारले तर चपलेकडे बोट दाखवून मी त्याला तत्काळ सांगेन "ते चपलेला विचारा!"

श्री. पादत्राणे यांच्या भाषणानंतर 'धी दिगंबर टेलरिंग फार्मचे मालक श्री. फडके टेलर भाषणास उभे राहिले आणि म्हणाले,

"बंधुभगिनीनो! मी आजवर अनेक प्रेमवीरांच्या आणि प्रेमबालांच्या कपड्यांची मापे घेतली आहेत. आणि त्यांचे कपडे बेतले आहेत. अनेक तरुण—तरुणींची मापेही मला पाठ आहेत. पण म्हणून प्रेम कसे करावे? या परिसंवादात भाग घ्यायला मी कसा काय लायक ठरतो ते मला कळलेले नाही. अर्थात् अनेकदा टेप झिजलेली असल्याने त्यावरचे आकडे न कळूनही आम्ही गिऱ्हाईकांचे कपडे शिवतोच ना? तसेच आजच्या विषयाचा काही अंदाज नसताही मी या परिसंवादात माझे विचार मांडण्याचे मान्य केले. असो.

"मला प्रथमच सांगावेसे वाटते 'की एखाद्या टेलरने वेडींगसूट न दिल्यामुळे लग्न लांबणीवर पडल्याचे एखादे उदाहरण असेल पण कपडा वेळेवर न दिल्यामुळे कुणाचा प्रेमभंग झाल्याचे माझ्या तरी

ऐकिवात नाही. कारण वायदे देणे आणि आणि ते न चुकता, न पाळणे, हे प्रेम आणि शिवण यांचे वैशिष्ट्य आहे! (हंशा नि टाळ्या) प्रेमात पडलेल्यानी भेटीचा दिवस...वेळ...अगदी क्षणही ठरवावा आणि त्यापैकी एकाने यायला उशीर करावा किंवा येऊच नये. असे केल्याने प्रेमपात्राचा जो तडफडाट होतो त्याने परिणामी प्रेम वाढते कारण विरहाने प्रेमाची रुची वाढते असे म्हणतात. कपड्याचेही तसेच आहे. तो जेवढा जास्त उशीरा मिळेल तेवढा जास्त चांगला शिवला जातो. व म्हणून जास्त टिकतो. घाईघाईने कपडे शिवून मागणाऱ्या गिऱ्हाईकांचे कपडे फिट् होत नाहीत. तसेच घाईघाईने प्रेम करणारांना 'फिट्' जोडीदार म्हणजे योग्य जोडीदार मिळत नाही. असे एक नाही तर हजार बाबतीत प्रेमाचे नि शिवणाचे सूत आहे. आता प्रेम कसे करावे? यावर चार शब्द सांगतो.

"प्रेम करणाऱ्या व्यक्तीने दुसऱ्या प्रेमिकपक्षाचे प्रेम, आम्ही कापड तपासून घेतो तसे तपासून आणि मोजून घ्यावे. कारण नंतर रंग गेला किंवा कापड कमी पडले तर गिऱ्हाईक शिप्यालाच दोष देते. तसा दोष माथी येऊ नये म्हणून 'कापडाप्रमाणे प्रेम आटणार नाही ना?' याची खात्री करून घ्यावी. आणि प्रेमावर सच्चेपणाच्या सन्फोराईज्चा शिक्का आहे की नाही ते काळजीपूर्वक पाहून घ्यावे. भडक रंगाच्या कापडाचा रंग बरेचदा लवकर जातो. भडक रंगाच्या प्रेमाचे पण तसेच असते. म्हणून भडक रंगाच्या 'गॉडी' कपड्यासारखे भडक रंगाचे प्रेम टाळावे. तीच गोष्ट मापाबाबत. आम्ही शिंपी लोक मापे घेतो ती वास्तविक गिऱ्हाईकांच्या समाधानासाठीच. आम्ही कपडे शिवतो ते आमच्या कल्पनेतल्या मापाप्रमाणेच. पण माप घेण्याची ती रीत पाळावीच लागते. प्रेमिकानाही प्रेमाच्या रूढ रीति पाळाव्याच लागतात. नाहीतर प्रेम असफल होते. प्रेम ही एकट्याने करण्याची गोष्ट आहे. एक कपडा दोन शिंप्यानी शिवल्यास बिघडतो. तसेच प्रेमाचे आहे. प्रेम एका हाती हवे! दुसऱ्याची मदत प्रेमात धोकादायक ठरते. एकाने कटींग करून दुसऱ्याने शिवलेल्या कपड्याचे जसे बारा वाजतात तसेच प्रेमात दुसरा आला की आपल्या प्रेमाचे बारा वाजलेच म्हणून समजावे!

"काही काहींच्या प्रेमाला काही काही कापडांप्रमाणे आटण्याची सवय असते. आटलेले प्रेम आटलेल्या कपड्यांसारखे टोचत राहाते. आणि माणसाला अस्वस्थ बनविते. तीच गोष्ट कलरबाबत. प्रेमातही कपड्याप्रमाणे 'कलर फास्ट आहे'. या गॅरेंटीला अर्थ नसतो आणि फास्ट 'कलर'वाल्या मुलींच्या व मुलांच्या बाबतीत तर प्रेमाचा संभवच नसतो. काही काही दुकानदार रंग गेल्यास कापड

परत घेतात. पण रंग उडाल्यानंतर प्रेम परत करण्याची काहीच व्यवस्था नसल्याने मघाशी म्हटल्याप्रमाणे प्रेमाचा रंग पारखून घ्यावा लागतो. एकदा प्रेम सफल झाल्यानंतर माणसाला जरी कपड्यांची गरज वाटेनाशी होत असली (हंशा) तरी प्रेम जमत असताना कपड्यांच्या व्यवस्थितपणावर आणि स्मार्टपणावर बरेचसे अवलंबून असते. म्हणून होतकरू प्रेमिकानी भरपूर कापड देऊन कपडे शिवून घ्यावे. अपुरे कपडे देऊन त्यात जास्त कपडे 'बसविण्याची' गळ शिंप्याला घालू नये. कारण नाहीतर ऐन वेळी नको तिथे कपडे फाटायची व्यवस्था करून शिंपी तुमच्या प्रेमाचा काळ ठरवू शकतो !

प्रेम आणि कपडे यांच्या फॅशन्स नित्य बदलत असतात. हल्ली जसे अंग जास्तीत जास्त कसे उघडे पडेल हा विचार मनात ठेवून कपडे शिवावे लागतात तसेच हल्ली प्रेमही जास्तीत जास्त लोकांच्या कसे नजरेस भरेल आणि उघडे पडेल अशा पद्धतीने करावे लागते. म्हणूनच हल्ली आपल्याला उघड्यावर प्रेमिकांचे चाळे बरेचदा पहायला मिळतात. बस, रेल्वे, सार्वजनिक बागा..... यात हल्ली आपणास प्रेमाच्या बऱ्याच इंग्लीश फॅशन्स पहावयास मिळतात. प्रेमिकानी शिंप्याचा आदर्श ठेवल्यास त्याच्या फाटलेल्या हृदयास वेळीच शिवण बसेल आणि ती धावदोऱ्याप्रमाणे कधीच उसवणार नाहीत एवढे सांगून मी हे माप.... नव्हे हे भाषण पुरे करतो."

श्री. फडके टेलर यांचे भाषण संपल्यावर श्री कालिमाता न्यू आरोग्य भुवन आणि लॉजिंग बोर्डीगचे मालक श्री. स. दा. पोटभरे भाषणास उभे राहिले. ते म्हणाले :

"प्रेम आणि हॉटेल यांचा काय संबंध आहे या गोष्टी मी सांगायला हव्यात असे नाही, पण मी त्यांचा थोडा उल्लेख करतो. प्रेमाची सुरवात हॉटेलातल्या फॅमिलीरूममध्ये होते. गडकऱ्यांच्या भाषेत सांगायचे तर 'प्रेमाचा मार्ग हॉटेलच्या फॅमिलीरूममधून किंवा लॉजिंगच्या भाडयाच्या खोलीतून जातो.' हॉटेलाना फॅमिलीरूम्स नसल्या तर जगात प्रेमविवाहाना आळाच बसला असता असे मी धाडसाचे विधान करीत आहे. अर्थात् हे मी अनुभवाच्या बळावर बोलत आहे. प्रेमविवाहात हॉटेलाचे असलेले स्थान मला अभिमानास्पदच वाटते. पूर्वी तीन वक्त्यांनी सांगितलेल्या तीन गोष्टींपेक्षा हॉटेल या संस्थेचा प्रेमाशी अत्यंत 'निकटचा' संबंध आहे. हॉटेलात जाऊन खाणे ही प्रेमप्रकरणातली पहिली पायरी असते. पुढे हॉटेलातील पदार्थांची गोडी चाखता चाखता ओठातील अमृताची गोडी चाखणे हा प्रेमसाफल्यातील महत्त्वाचा टप्पा ठरतो. आणि लॉजिंगची खोली भाड्याने घेऊन रहाणे ही प्रेमसाफल्याची अखेरची पायरी ठरते. आता प्रेम कसे करावे ? या आजच्या विषयासंबंधी चार शब्द बोलणे जरूर आहे.

"मी एक हॉटेल मालक असलो तरी स्पष्टपणे सांगतो की प्रेम ही वस्तू कितीही चवदार असली तरी हॉटेलातील पदार्थाप्रमाणे रोज आस्वाद घ्यायची वस्तू नव्हे. हॉटेलातील पदार्थ रोज रोज खाऊ लागले की ते बेचव वाटू लागतात. प्रेमाचे पण तसेच आहे ! ते कधीमधी करावे म्हणजे त्याची गोडी टिकून रहाते. तसेच आमच्या हॉटेलच्या धंद्याप्रमाणे प्रेमातही 'प्रेझेंटेशनला' महत्त्व आहे. कारण मॉडर्न फर्निचर, उंची क्रोकरी, स्वच्छता, झकपकपणा इत्यादी गोष्टी असल्या की गिऱ्हाईक त्याच्यावरच खूष होते आणि त्याचे पदार्थाच्या दर्जाकडे आणि चवीकडे दुर्लक्ष होते व निकृष्ट पदार्थही गिऱ्हाईकाच्या गळी उतरविणे हॉटेलवाल्यास सोपे जाते. तसेच प्रेमासाठी टीपटॉप कपडा, मॉडर्न केश आणि वेषभूषा या बाह्य गोष्टींची अपेक्षा असते. कारण हल्ली प्रेम बसते ते या बाह्य गोष्टींवरच. एखाद्या फाटके कपडे घातलेल्या विद्वानावर एखादी चटकचांदणी कधी भाळेल काय ? पण एखाद्या निर्धन निर्बुद्ध पण 'अपटुडेट' तरुणावर एखादी सुंदरीही भाळते. यालाच आम्ही धंदेवाले 'प्रेझेंटेशन' म्हणतो. दुसरे असे की हॉटेलातील पदार्थाप्रमाणे प्रेम कधी शिळे होत नाही. आम्ही शिळ्या पदार्थापासून जसे इतर ताजे पदार्थ बनवितो तसे प्रेम शिळे झाल्यास, ते नव्या प्रकारानी केल्यास त्याची चव वाढते असा काही म्हाताऱ्यांचा अनुभव आहे. प्रेमिकांनी हॉटेलवाल्याप्रमाणे स्थितप्रज्ञ असावे. आम्ही हॉटेलवाले, गिऱ्हाईकांने उसळीतून जरी जिवंत झुरळ काढून दाखविले तरी चेहरा अगदी मख्ख ठेवतो. प्रेयसीने कितीही कटु भाषण केले तरी प्रियकराने तसेच मख्ख चेहेऱ्याने गप्प बसावे लागते. कारण असे केल्यानेच प्रेम सफल होते. प्रेमात स्तुतीला फार महत्त्वाचे स्थान असते. आम्ही हॉटेलातील प्रत्येक पदार्थामागे एक खमंग विशेषण चिटकवतो उदा. खमंग बटाटेवडा, कुरकुरीत शेव, मसालेदार चिवडा, टेसदार पुणेरी मिसळ, मनपसंत घरगुती भोजन वगैरे...... या विशेषणांनी गिऱ्हाईकांच्या तोंडास पाणी सुटून ते खूष होते. प्रेयसीलाही नेहमी अशीच खरीखोटी, सौंदर्यवाचक विशेषणे लावल्यास ती खूष होते व तिचे प्रियकरावरचे प्रेम पक्के होते या....... प्रमाणे हॉटेल या माध्यमातून प्रेम कसे करावे ? या प्रश्नाबाबत वरीलप्रमाणे मार्गदर्शन करता येईल.'

"माझे भाषण संपविताना हेही सांगतो की प्रेमाचे रूपान्तर लग्नात झाल्यानंतरही वर्षदीड वर्ष हॉटेलचा संबंध सुटत नाही तो येणेप्रमाणे. लग्नानंतर (पहिल्या वर्षात) कधी कधी बायकोला जेवण शिजवायचा कंटाळा येतो—कधी कधी नवऱ्याला ते जेवण जेवण्याचाहि येतो— आणि ती नवऱ्याला म्हणते 'आपण आज किनई हॉटेलातच जेवायला जाऊ या ना गडे.....' बायकोच्या हातचं जेवण जेऊन कंटाळलेला नवरा आनंदाने हो

म्हणतो आणि ते जोडपे पुन्हा एकदा हॉटेलात जेवायला येते. फरक एवढाच की ते फॅमिली रूममध्ये बसत नाही. म्हणून मी असे अभिमानाने सांगू इच्छितो की हॉटेलची पायरी चढल्यावांचून प्रेयसीच्या हृदयमंदिराची पायरी चढणे आजकाल कठीण होऊन बसले आहे. प्रियकर हॉटेलचे लट्ठ वील द्यायला तयार असेल तर प्रेयसी त्याच्या कानात प्रेमाची किलबील करायला तयार होते (टाळ्या) तेव्हा 'फॅमिली' हवी असेल तर फॅमेलीरूमला जवळ करणे जरूर आहे म्हणून श्री. शि. मा. परांजप्यांच्या भाषेत सांगतो की फॅमिलीरूम नाही तर प्रियाही नाही... आणि फॅमिलीही नाही......"

श्री. पोटभरे यांचे भाषण संपल्यावर किराणा दुकानदार पाशुमल आमसुलमल शाह आणि नर्गिस-छाप विडीचे मालक श्री. भुस्कटे यांचीही भाषणे कार्यक्रम पत्रिकेत छापल्याप्रमाणे व्हायची होती.... पण श्री. शाह यांची दुसऱ्याच दिवशी इन्कमटॅक्सची केस होती. ते वकिलीकडे गेले असल्याने आणि श्री. भुस्कटे हे त्यांच्या दुकानाची तपासणी करण्यास आलेल्या अबकारी इन्स्पेक्टरच्या कोंवडीच्या जेवणाच्या तजविजीत गुंतल्याने येऊ शकले नाहीत. दोन्ही वक्ते हजर नसल्याने अखेर अध्यक्ष सहकारमंत्री श्रीयुत काळुबुवा कोकाटे यांनी परिसंवादाचा समारोप केला. ते म्हणाले,

"समाजाच्या चार आधारस्तंभांकडून प्रेम या सनातण आनि सौंस्कृतिक विषयावरचे विचार आपण ऐकलेत. सुप्रसिद्ध कवि श्रीमंत तुलसीदास याणी म्हटलेच आहे की 'क्षण एक पुरे प्रेमाचा वर्षाव पडो मरणाचा!' परंतु आताच्या या लोकशाहीच्या युगात प्रेमासाठी कुनी मरू नये. देशासाठी मरावे! तरीही मी आपल्याला आश्वाशण देऊ इच्छितो की सरकार जनतेच्या म्हंज्ये पब्लीकच्या प्रेमविषयक अडचणी लक्षात घ्यायला केव्हाही तयार आहेत. महाराष्ट्र कवि यशवंत यानी म्हटलेच आहे की 'एकामेका साह्य करू अवघे घरू सुपंथ!' कवि यशवंताचा हा संदेश आपण ध्याणात घेतला पायजेल हाय आणि प्रेमाची सहकारी तत्वावर उभीरणी केली पायजेल हाय! (टाळ्या) तरुणानी प्रेमाच्या सहकारी सोसायटया काढल्यास सरकार आवश्यक ते सर्व साह्य करील असे मी आश्वासन देतो. तेव्हा तरुणानी विविध कार्यकारी सोसायटया काढायला पुढे यावे. सहकाराशिवाय प्रेम नाही...आणि सहकाराशिवाय उद्धार नाही...प्रेम आणि सहकार यांची आपुन लोकानी सांगड घातली पायजेल हाय आणि म्हणून प्रेमविवाहाना सरकार, सक्तीय उत्तेजन द्यायला तयार आहे (प्रचंड टाळ्या)

"सहकार मंत्र्याचे हे विद्वत्तापूर्ण भाषण संपल्यावर वक्त्याना हारतुरे झाल्यावर परिसंवादाचा कार्यक्रम समाप्त झाला त्याचा हा रिपोर्ट!

★★★











अनुक्रमणिका

# एक इरसाल विनोदी कथा



नारो साटलोटकरनं आजवर कितीतरी पुढारी पळविले अन् वारेमाप पैसा कमावला खरा परंतु चिपाटपूरच्या त्या तरण्याबांड तोतया पाटलाला मात्र पळवताना त्याच्या स्वतःच्या खिशाला चांगलीच चाट बसली हं !

—वा. रा. सोनार

**नारो** साटलोटकर हा घिगाणापुरातला महा बिलंदर माणूस. इतका की या भागातून कुणी मायबोलीचा अभ्यासक निपजता तर 'बिलंदर' या शब्दापुढे तो नारो साटलोटकरचं नाव सटकन् लिहून मोकळा झाला असता.

आता कुणीही शंका काढील की या भागात नारो साटलोटकर एकादा पुढारी आहे की काय, तर तसं नव्हे. तरीही हा माणूस बिलंदर म्हणून प्रसिद्ध आहे. तो कुणी पुढारी नसूनही त्याचा पुढाऱ्यांशी अगदी जवळचा संबंध आहे. तसा घिगाणापुरात पुढाऱ्यांचा सुकाळ आहे. कुणी एका होतकरू संशोधकाने तर चक्क या भागात पुढाऱ्यांच्या सुकाळामुळेच गावास 'घिगाणापूर' नाव पडले असावे अशीही शंका नोंदून ठेवली आहे.

अशा या नगरात आज मध्यभागी नारो साटलोटकराचे 'जनसेवा' हे एक अद्यावत् विश्रामधाम आहे. 'जनसेवा' म्हटले की नारो साटलोटकरसह त्याची उंच इमारत डोळ्यासमोर उभी राहाते. हे सगळे नारोने स्वतःच्या हिकमतीवर मिळविले आहे. तुम्ही कधी नारोस विचारलेच तर तो आपल्या आखूड मिशीत हसून, पानाचा तोबरा मुद्दाम चढवून 'जनसेवे'ची कुळकथा सांगेल. तुम्ही क्षणोक्षणी भूकंपाचे धक्के खावे तसे त्याच्या करामतींनी थक्क व्हाल. तांबूल रसामुळ किंचित् अश्वमुखाची कळा आलेला नारो साटलोटकर स्वतःच्या वाढत्या पोटाकडे लक्ष वेधून तुम्हास एक सार्वजनिक सत्य ऐकवील, "राजे, स्वातंत्र्य मिळाल्यावर, काही म्हणा कल्याण झालं. नाहीतर आयला कल्हई करता करता जन्म काळा झाला असता... खुक् खुक् खोऽऽक्ऽ."

वास्तविक 'जनसेवा' होटेल काढून रात्रंदिवस गल्ल्यावर बसणाऱ्या नारो साटलोटकराचा वेगळा उद्योग असेल अशी शंका तरी येईल का ? शक्य नाही, पण साटलोटकराचा खरा उद्योग हा नव्हे ! खायचे आणि दाखवायचे यांतील 'जनसेवा' हे क्रमांकाने डावे. नारो साटलोटकराचा खरा धंदा—होय, जरा कान इकडे करा — पुढारी पळविण्याचा आहे. आता तुम्ही पोट धरून हसाल. हा काय धंदा झाला ? हीच तर गम्मत आहे. जगावेगळा धंदा थाटून साटलोटकर आज पाय रोवून बसला आहे. एकवेळ आता साटलोटकर हा धंदा सोडून द्यायचे मनात आणील, पण घिगाणापुरातले पुढारी या गोष्टीला मुळीच तयार होणार नाहीत. कारण 'पुढारी पळविणे' हा जसा साटलोटकरचा धंदा तसा 'पळवून घेणे' हाही घिगाणापुरातल्या कित्येक धंदेवाईक पुढाऱ्यांचा धंदा आहे ! आता बोला ! उद्या साटलोटकराने 'मी हा धंदा आजपासून सोडला आहे' असे घोषीत केले तर कित्येक प्रसंगपरत्वे पलायनेच्छु पुढाऱ्यानी पोटासाठी कुणामागे धावावे हा प्रश्नच आहे.

कोलंबसला अमेरिकेचा शोध लागल्यावर जेवढा आनंद झाला

असेल, भारताला स्वराज्य मिळाल्यावर जनतेला—नाही चुकलंच— पुढाऱ्यांना जेवढा आनंद झाला असेल, दारूबंदीमुळे हातभट्टीवाल्यांना जितका आनंद झाला असेल तितकीच खुबी नारो साटलोटकर या प्राण्यास 'पुढारी पळविण्याच्या' प्रथमदर्शनाने झाली होती.

वास्तविक साटलोटकरांचे घराणे धिंगाणापुरातल्या भांड्यांना कल्हई करण्यासाठी प्रसिद्ध. गेल्या तीन पिढ्या तरी नारोचे घराणे धिंगाणापुरातल्या भांड्यांना उजाळा देण्यासाठी आपली काया झिजवीत अंधाऱ्या बोळीत जन्म घालवीत आले. नारोचा अर्धा जन्मही असाच गेला. पण त्याच्या आयुष्याची कथीलापासून सोडवणूक करून त्याचे सोने व्हायची वेळ आता प्रथम स्वराज्यात आली होती. तो प्रसंग आजही नारोच्या डोळ्यासमोर जसाच्या तस्सा उभा राहतो.

त्या दिवशी खालसा झालेल्या प्रधानाघरची भांडी उजळवून घरी परतलेल्या नारोला आपल्या छपरात अंधाराचा आश्रय घेतलेली, चारपाच शुभ्रवस्त्रधारी मंडळी कुजबुजत असलेली आढळली. नारो भयंकर चरकला. 'चोर चोर' म्हणून ओरडावे असे त्याला फार वाटू लागले. पण आपल्या घरात शिरण्याचा विनोद कुणीही खरा चोर कधीच करणार नाही हे त्याच्या मनाने घेतले. अर्थात् जेथे चोरही शिरायला धजत नाहीत त्या आपल्या खोपटात भरल्या रात्री शिरणारे प्राणी कोण असावेत याची साटलोटकराच्या बुद्धीला चिंता निर्माण झाली. चिंतेची जागा हळूच जिज्ञासेने घेतली. आणि क्षणार्धात् त्याची जिज्ञासा पूर्ण झाली. धिंगाणापुरातल्याच पुढाऱ्यांचा एक कळप त्याच्या ओसरीत ऐसपैस पसरला होता.

साटलोटकर ओटा चढून आल्यावर सगळ्यांनी त्याला घेरले. आपले कळकट धोतर सावरीत नारोने घरी आलेल्या भल्या भल्या मंडळींना बसायला म्हणून काही टाकावे या उद्देशाने उगाचंच चाचपडले. तोवर कुणी एक टणटणीत आवाजात नारोस म्हणाला, "नारबा, आम्ही बसतो. तूही बैस. वेळ थोडा आहे. आम्ही आलो तुझ्याकडे ते—"

यावर क्षणभर ते बोलणारे तोंड मिटले गेले. शांतता इतकी पसरली की नारोने गिळलेला आवंढा सगळ्यांना ऐकू गेला. पुन्हा दुसरा आवाज, "नारायणराव—"

नारो साटलोटकरास या 'नारायणरावा'ने सर्वांगास शिरशिरी आणली. आनंदाची कळ उठून अंगभर पसरली. आणि त्याचे काळीज थाड् थाड् उडू लागले. कथलाच्या वेटोळ्यासारख्या दुमडलेल्या टोपीला साटलोटकर कोन काढून 'नारो' चा 'नारायण' व्हायचा त्या अंधारातही प्रयत्न करू लागला !

"नारायणराव—"

"ओ ऽ—"

"आमच्यापुढे प्रश्न मोठा बिकट आहे."

"आहे—" नारोने अंधारातले पांढरे ठिपके उगाचच मोजले. तोच आवाज पुढे, "आज आपल्या राष्ट्राला स्वातंत्र्य मिळाल्यामुळे—"

हे वाक्य मध्येच कापणारा दुसरा एक करवती आवाज अंधाराच्या एका कोपऱ्यातून आला,

"मास्तर, ते नंतर होईल. मुद्याचं बोला.—"

"अरे हो—" मघाचाच पण ओशाळा आवाज,

"त्याचं काय आहे नारायणराव, निवडणुका आल्या उद्यावर."

"हो."

"आमची पार्टी यंदा यायलाच हवी."

"—हवी" साटलोटकराने आवंढा गिळला.

"आम्ही सगळ्यांनी जाम प्रयत्न केले आहेत. आणि ते होणारच—"

"काय ?"

"हे आपलं ते. . ." म्हणजे सांगायचं असं की आम्ही प्रतिपक्षाचा माणूस फोडला आहे."

"अरेरे ! माणसाला कशाला फोडून काढलं ?"

साटलोटकराचं प्रथमच पूर्ण पण चुकीचं वाक्य आणि पाठोपाठ हळहळ व्यक्त झाली. यावर मंडळी गपगार झाली. साटलोटकरास सांभाळून घ्यायलाच हवे होते ! या प्रकरणात नारो म्हणजे अगदी नवीन माणूस हे सर्वांना पटले. तेव्हा जास्त खोलात न शिरता कुणीतरी मुद्यालाच हात घातला.

"हे बघ नारबा, आम्ही एक माणूस सोबत आणलाय्. त्याला इथंच तीन – चार दिवस ठेवून घे. त्याला काय हवं नको ते पहा. पण या घराचा उंबरठा ओलांडता कामा नये त्याने. काय ? – तीन दिवस धंदा बंद ठेव."

"मालक, हे काय भलतंच. तीन दिवस धंदा. . ."

"तू गप रे. जरा ऐक तरी." मास्तर नारोस समजावू लागले, "नारो आपल्याला स्वातंत्र्याचा लाभ घ्यायचा ना ?"

"हो. पण –"

"आपल्या देशात लोकशाही समाजवाद आणायचा की नाही ?"

"आणा हो, पण—"

"मास्तर, ते होईल हो नंतर. प्रसंग काय. आणि खुशाल तुम्ही लोकशाही–नि विकशाही असल्या फालतू भानगडी आणताहेत इथं—" मघाचा करवती आवाज.

# पुढारी पहावा पळवून








अनुक्रमणिका





"चल नान्या, हे घे पांचशे रुपये.–" करवती फर्मान. 'नारायण-रा'वा'चा 'नान्या' झालेलं खरं तर साटलोटकरास आवडलं नाही. पण पांचशे रुपयांच्या बिदागीनं त्याने हा अपमान फुलासारखा झेलला.

"आणि काय करायचं ? नको बाबा." नारो. "लेका, जन्मभर कल्हई करीत हिंडलास तरी दिसायचे नाहीत." करवती आवाजाला धार.

"आताही दिसणार नाहीत–" मास्तर मध्येच.

"काय मास्तर भलतंच हे."

"नाही, अंधार आहे म्हणून म्हणतो."

मास्तरांचे म्हणणे प्रथमच सगळ्याना पटले. कुणीतरी आगपेटी काढली. एक काडी पेटवली. त्या प्रकाशात चार पाच चेहरे जेमतेम उजळले. नारोने पटापट चेहरे टिपून घेतले. दुसऱ्या काडीवर नोटा मोजल्या, आणि ज्याला तीन दिवस ठेवून घ्यायचे त्याचा चेहरा चांगला निरखून घेतला. हो ! न जाणो भलताच पुढारी मागं राहीला तर––

कितीतरी वेळ नारो साटलोकरास झोप आली नाही.

नोटांचे पुडके घट्ट पकडून धरीत तो रात्रभर 'पळविलेल्या पहिल्या पुढाऱ्या'वर भवानीच्या पहिल्या गिऱ्हाईकासारखा निगा राखू लागला. आणि पुन्हा भांड्यांना कल्हईसाठी स्पर्श करायचा नाही अशी त्याच रात्री त्याने प्रतिज्ञा केली.

त्यानंतर या नव्या धंद्यात नारो साटलोटकराचे बस्तान चांगलेच बसले. त्याने पिढीजात धंदा जसा दूर केला तसा कळकट कपड्याना फाटा देऊन सर्वांगावर जाडीभरडी पण शुभ्र खादी चढवली. आता तो कल्हई केल्यासारखा धिगाणापूरच्या गल्ली-बोळातून फिरू लागला. त्याचे तोंड पानाने सदा रंगलेले दिसू लागले. नेहमी तो घाई-घाईत चालताना दिसायचा. पांच-पंचवीस माणसे पाठीमागून चालताहेत अशा पुढाऱ्यासारखा तो एकटाच रुबाबात रस्त्यावरून धावू लागला. त्याच्या चेहऱ्यावर हळू हळू तकाकी येऊ लागली. गाल वर येऊ लागले. सोनेरी काड्यांचा चष्मा दृष्टीत काहीच बिघाड नसतानाही उगाच चढविला. साटलोटकराच्या नशीबाने निवडणुकांचा पूरच धिगाणापुरात उसळला. ग्रामपंचायती-पासून थेट दिल्लीच्या पार्लमेंटपर्यंत तर विद्यार्थ्यांच्या निवडणुकां-पासून भगिनी-मंडळाच्या निवडणुकापर्यंत थेट साटलोटकराचा संबंध येऊ लागला. किंबहुना साटलोटकराशिवाय निवडणूकच पार पडेनाशी झाली. एक वेळ मतदान केंद्रावर अधिकारी नसले तरी चालेल, पण साटलोटकर निवडणुकीत हवाच, अशी सगळ्यांचीच खात्री झाली.

एकादा माणूस फोडण्यापासून तो मतदारांचा कळपच्या कळप फोडण्यात नारो साटलोटकरास 'किस झाडकी पत्ती' होऊन बसले. एकेका दिवसापासून ते दोन दोन महिने माणसे गायब करण्याची युक्ति खास साटलोटकराचीच. फार काय आपण पळविले गेलो आहोत हे प्रत्यक्ष पळणाऱ्यानाही वाटत नसे. इतकेच काय, अशी पळवून नेलेली मंडळी साटलोटकराच्या व्यवस्थेवर एवढी खूष असत की ती घरी परत यायला चक्क नाखूष असत. पुढे पुढे तर साटलोटकरास दुहेरी उत्पन्न सुरू झाले. पळविण्याबद्दल पुढाऱ्यां-कडून नि घरी आणून सोडण्याबद्दल घरच्या मंडळींकडून.

हळू हळू साटलोटकराची कीर्ती जिल्हाभर पसरली. साटलोट-करास दूरदूरची निमंत्रणे येऊ लागली. कुणाकुणाची तातडीची तार येई, 'येथील निवडणूक फारच व्यवस्थित पार पडत आहे. काहीच रंग नाही तरी निघून यावे.' अर्थातच् मागणी वाढल्याने साटलोट-कराने आपल्या धंद्याचा भावही वाढविला. पुढे पुढे तर ग्रामपंचायती-सारख्या चिल्लर निवडणुकांच्या 'ऑर्डरी' तो चक्क नाकारू लागला. त्यावर नारोचे म्हणणे कुणाही सुबुद्ध (वा निर्बुद्ध) माणसास पटेल असेच असे, तो म्हणे, "पार्लमेंटचा एक मेंबर पळविला तर इथं चार आकड्याची रक्कम धंद्यात सुटते, तिथं कोण लेकाचा या पंचायतीच्या घोळात पडतो. छय : ! म्हणे पांचशे घ्या नि हजार घ्या. हुं ऽ !" अर्थातच् धंद्याच्या वाढीसाठी नारोस 'जनसेवा' उघडावी लागली. आता पुढारी पळविण्यासाठी त्याला उगाच पळापळ करावी लागत नव्हती. उलट बसल्या जागीच त्याला 'पळवून आणलेली' गिऱ्हाईके वाढली होती.

या कामाला त्याला तुका भिंगाळेची साथ विलक्षण होती. रामदासांचा कल्याण तसा साटलोटकराचा 'कल्याण' तुका भिंगाळे. 'जनसेवा' घातली आणि नारोने तुकास 'जनरल मॅनेजर' करून टाकले. अर्थात् कधीमधी धंदा मंदीत असला की 'पोऱ्या, फडका मार' या हुकुमाखाली टेबलं पुसावी लागत, ते सोडा. एरवी नारोने काउंटरवरून उजवी भुवई वर केली की तुका भिंगाळे डावा डोळा घालून 'माणूस' पळविण्याच्या व्यवस्थेला लागे.

आणि स्वराज्यातला इतका किफायतशीर धंदा चक्क मोडून देण्याचे महान् संकट नारो साटलोटकरावर एक दिवस अचानक कोसळले. धिगाणापुरातल्या पंचायतीच्या निवडणुका जोर धरू

म्हैसूरी होळी !




म्हैसूऱ्यानी मोरारजीभाईंचा दक्षिणेचा दौरा रद्द केला

लागल्या त्याच सुमारास तुका भिगाळेच्या पोरीचे लगीन निघाले. वास्तविक अशावेळी स्वत:चं सुद्धा लग्न वाजला सारायचं ते तुका भिगाळेने मुलीचे लग्न काढले हे नारोस खटकलेच. तसे त्याने तुकोवास परोपरीने विनवून पाहिले.

"तुका, अरे देशात माणसं अशी भिगरी लावून हिंडताहेत. अशावेळी लग्न ?"

"आता त्ये काय आपल्या हातात असतं व्हयं ?"

"मग कुणाच्या हाती असतं ? लेका, कोंडाण्याचं लगीन आधी मग रायबाचं असं म्हणणाऱ्या जातीतला तू—"

"हा मालक, त्येवडी जात काडू नगा. त्ये तानाजीच म्हनाल तं त्येला आपला कारू हाये. लगीन रायबाचं हुतं म्हणून. पोरीचं असतं तं त्यो ग्येला असता का न्हाई—"

"अरेरे, काय बोलतोस हे !—"

"खरं हाय मालक. पोरीचं लगीन म्हंजी लई आफत बघा."

"ते खरं रे. पण हीच आपल्या धंद्याची वेळ ना ?"

"आत्ता या वक्ताला तुमी बगून घ्या. लगीन आटपलं का येत्योच न्हवं !"

आणि तुका भिगाळे तरतरा निघून गेला. त्याच रात्री 'जनसेवे'शी एक गाडी येऊन उभी राहिली. भराभरा माणसे ओसंडून बाहेर पडली. आता यावेळी हॉटेलात कुणीच नव्हते. साटलोटकर पेंगुळत बसला होता. त्या शुभ्र मंडळीपैकी एक म्होरक्या सरळ साटलोट-कराच्या शेजारी खुर्चीत जाऊन बसला.

"नारायणराव, रामराम."

"रामराम." सोनेरी चष्मा नीट केला.

"आमी चिपाटपूरची मंडळी."

"ओळखलं !"

"फार घोळ झालाय् बगा गावात. आयला कहार झाला इले-क्शनपायी."

"चालायचं चालायचं. अहो, आम्ही प्रोट कस भरायचं ?"

"ह्यं: ह्यं: !"

"ख्यॅक् ख्यॅक् ख्यॅऽऽक्" आणि साटलोटकराने टाळीसाठी हात पुढे केला. त्याच्या हातात हात अडकवीत कानाशी लागून तो पोक्त पुढारी सांगू लागला,

"नारोजी, गावातलं एक पोरगं भारी वांड निगालं बगा. ऐकत न्हाई ! समद्यास्नी समजुती घातल्या, पन उभंच न्हायाचं म्हनतो इलेक्शनला—"

"बारंऽ ! अस्सं ?"

"त्येला म्हटलं, आयला, तू आधी वोहल्यावर चढ की रं ! मंग हितं उभा न्हा. न्हाई ऐकत. आमच्या शीटला धोका हाये बगा."

"हात्तिच्या ! तुमच्या सीटला हात लावायची कुणाची छाती आहे. ही 'जनसेवा' बंद करावी लागेल राजे ! द्या धाडून इकडे त्याला. करू नीट."

"बगा बरं, पोरगं लई खराब हाये. आयला घडीत काय तं












अनुक्रमणिका

घडीत काई. त्यो मुद्याचंच बोलंल, पन आडवळणानं–"

"तुम्ही ह्या धाडून इथं. नीट करतो. बिनघोर इलेक्शन लढवा. –तेवढं अॅडव्हान्सचं पहा."

"किती लागत्याल ?"

"ह्यं : ह्यं :! तुमच्यापास्नं काय घ्यायचे ? खरं तर पंचायतीच्या भानगडीत पडत नसतोच मी. आता तुमी आलात, ह्या झालं दोन हजार."

"दोन हजार ?. . . फार होतात हो !"

"फार कसचे ? सीट संभाळायची म्हणजे–"

"तरीपण–"

"आता मालक, निवडून आल्यावर एका टेंडरात–"

"हां हां !– कबूल. कबूल."

"कां हो ! न्हायलं !! नाही बोलत. ठरलं ?"

"आता काय !" असं म्हणत त्याने खिशातून नोटांची पुडकी साटलोटकराच्या हवाली केली. नोटा मोजता मोजता साटलोटकराने विचारले.

"हं, केव्हां येणार तुमचा माणूस ?"

"परवाला धाडतो. कुणी ओळखीचं धाडू का ? सोबतीला?"

"काही नको. माणसं पळविण्यात हयात चालली. पोरगं मैलावरून ओळखीन्. जावा तुम्ही."

एवढे आश्वासन घेऊन ते पांढरे टोळके पटकन् मोटरीत शिरले. आणि पहाता पाहता दिसेनासे झाले.

तिसरे दिवशी नारोने सकाळपासून करडी नजर ठेवली. 'जनसेवे'च्या दारातला प्रत्येक माणूस न्याहाळण्यात आला. आज तुका भिगाळे नव्हता, तेव्हा जातीने लक्ष घालणे भाग होते. साटलोटकर तर आता भिगाळचावर भयंकर भडकला होता. नको तेव्हा लग्न काढायचं, म्हणजे काय ?

आणि नेमका नको त्यावेळी तुका 'जनसेवे'त शिरला. तो घावराघुवरा झाला होता. चेहरा काळवंडलेला; पार नासल्यासारखा झालेला.

"मालक" तुका अजीजीने म्हणाला.

"काय आता ?"



"मालक, लई आफत आलीय् वगा–"

"आता कसची आफत !"

"पोरीचं लगीन हो ! जावईबापू रुसल्यात. देनी-घेनी ठरली पन् आता ऐन वक्ताला चावटपना सुरू केलाय्, काय म्हणावं !"

"मग मी काय करू ?–"

"जरा नड भागवा म्हणतो. पोरगा ऐकायला तय्यार न्हाई. काय काय मागतो. म्हनतो सायकल पायजे; तारकेचं घड्याळ पायजे आरं आता काय मरायचं ?. .. ."

"तुका, मला काऽही सांगू नकोस. परवडत नसेल तर नोकरी सोड. माझं काही म्हणणं नाही."

"आसं कसं मालक ?–" यावर तुका भिगाळे ओंडक्यासारखा बसून राहीला. पाच-सात मिनिटे अशीच गेली. शेवटी साटलोटकर पाझरत नाही असं बघून तुका निराशेने पावलं टाकीत निघून गेला.

• साटलोटकराची नजर पुन्हा चिपाटपूरच्या तरण्या पुढाऱ्याला पाहण्यासाठी भिरभिरू लागली. पण सांगितल्या वर्णनाचा पोरगेला पुढारी येण्याची ढीम चिन्हे दिसेनात. हा पोरगा डोळा चुकवून तर येऊन गेला नसेल ना, साटलोटकरास जरा शंका चाटून गेली.

तिन्ही सांजा झाल्या. दिवे लागले. 'जनसेवा' ट्यूबच्या प्रकाशाने भरून गेली. आणि काय आश्चर्य, एक चक्क पोरगेला पांढऱ्या टोपीचा पुढारी 'जनसेवे'त शिरला. तो आला ते पाय हापटीत, घुसफुसत, स्वतःशी वरळतच मुळी. आणखी काय खुणा हव्या होत्या ? नक्कीच हा ! आल्या आल्या त्याने खुर्चीवर दाणकन् बसकण घेतली. टेबल गदगदा हलविले आणि नाकपुड्या फेंदारून 'एक स्पेशल'ची बोंब ठोकली. त्यासरशी साटलोटकराचा जीव भांड्यात पडला. चिपाटपूरचा पाटील शेवटी आला तर ! वारीक नजरेनं त्याने पाटलाला निरखले. मनात पुटपुटला, 'लेका दिवसभर तुझी वाट पहातोय्. होतास कुठं ? म्हटलं समझोता केला की काय? म्हणजे मुसळ केरात !– नाही, नारोचं नशीब जागं आहे. आता माझ्या तावडीतून तू जात नाहीस. दिसतो जरा वेरक्या. . . पण पोरगंच !–"

साटलोटकराने आपली जागा सोडली. आपलं दोंद सांभाळीत त्यानं खुर्ची सोडली नि डुगडुगत 'पुढाऱ्या'जवळ आला. जीभेवर मध सांडत म्हणाला,

"मालक, ओळखलं मी–" आणि 'ओळखलं' हे दाखविण्यासाठी उगाचंच निरखून पहात राहीला. त्या पोरगेल्या पुढाऱ्याच्या नाकपुड्या आणखीन् बेडकीच्या श्वासासारख्या फुगू लागल्या. त्यानं टोपी दाणकन् टेबलावर आदळली. वर खेकसला,

"ओळखलं ना. बरं झालं ! तुम्हीही त्यातलेच."

"नाही, रागावू नका असे. 'जनसेवा' आपलीच आहे. काय सेवा करू—"

"पांच दहा मिनिटं गप्प बसा."

"मग वर चलना. दहा मिनिटंच काय दहा दिवस राहा."

यावर तो पोरगा पोट धरधरून हसू लागला. साटलोटकरने






खले, पोरगं इब्लीस आहे.

"मग काय वर जायचं म्हणता !"

"हो. तिसऱ्या मजल्यावर खास खोली–"

"खास खोली ? एका कपात–"

"ह्य:! चहाचं सोडा. म्हणाल ते मिळेल. आधी चला तर खरं–"

"तरी म्हातारा म्हणत होता बगा, मालक म्हंजे देवमानूस. पन त मात्तर––"

"ह्य: ह्य: ! कसचं कसचं."

ाटलोटकर त्या तरुण पुढारी पोरापुढे वाकवाकून अदबीनं चढू लागला. आणि तो बिलंदर कारटा राजाच्या तोऱ्यात क पाऊल उचलीत 'जनसेवा' डोळ्याखाली घालत होता. ण हे गिऱ्हाईक चमत्कारिक होते तरी !

तिसऱ्या मजल्यावर एक हवेशीर खोली उघडताच वारा भरा वाहू लागला. पोराच्या गालावर आनंद झळकला. तो ाला,

"मालक–"

"मी साटलोटकर. नारो. तुम्ही मालक म्हणायचं नाही. कितीही ं तरी तुम्ही आमचे. . . आमचे. . ."

"वाऽ वाऽ !– पण मालक अशी नाती आज कोण कुणासाठी ाळतं ? अं ?–"

"आमचा धंदाच आहे हा ! नाती घट्ट झालीच पाहिजेत. तुम्ही कुठंही जा. अगदी दिल्लीत अगदी दिल्लीत इंदिराबाईकडे. सांगा, 'जनसेवे'तून आलोय्. फटकन् खुर्ची मिळेल !"

"मंडळी म्हनत हुती बगा समदी. म्या काय घ्यानं न्हाई दिलं. अवो माजं टाळकंच फिरलं–"

"चालायचंच. तरुण आहात. असं कसं चालेल !"

"वा ऽ! मालक, तुमीच सांगा, हीच येळ आसती का न्हाई हौस फिटवायची–"

"म्हणजे ? हे काय सांगणं ?– प्रश्नच नाही."

"मंग ? आयला मला बोलूच दीना कुनी."

"छय: छय: फार वाईट."

"आता मालक, हितंच ऱ्हायाचं का ?"

"वा ऽ! घर आपलंच आहे. काहीहि संकोच नको. सगळी व्यवस्था केली आहे."

"म्हंजी ?. . . त्येवडं घड्याळाचं–"

"घड्याळ ? हां हां ! या खोलीत घड्याळ नाही. नाही का?. . . आता असं करा–"

"काय – ?"

"हे माझ्या हातातलंच घ्या बगू तूर्त."

"त्ये कशाला ? येईल की सावकाश–"

"नको, असू दे." आणि घड्याळ पुढारी-पोराच्या हातावर चढवताना साटलोटकराची खात्री झाली, पोरगा दिसतो महा-



अनुक्रमणिका

बिलंदर. उगाच नाही चिपाटपूरच्या मंडळींना हैराण केलं ! सरळ गोष्टी करीत नाही काय ? लेका, तुझे वाग्से जेवलोय् !

"धाकी मालक, वेळेवर कोन उपेगी यील हे काय सांगता यायचं न्हाई !" पोरगेला.

"होय तर ! काहीच सांगता यायचं नाही.

आणखी काय हुकूम ?—"

"हुकूम ? छय: ! तुमी तरी फारच लाजविता." चिपाटपूरचा पाटील.

"पाटील, तुम्ही विगाणापुरात नवीन काय ? पूर्वी पाहीलं नाही कधी म्हणून म्हणतो."

"आता कुनी पाहील विगाणापूर. ह्या भानगडीत पडलो म्हणून यावं लागलं."

"ओ, भानगड कसली त्यात ? कुणाला सुटलंय् हे ? या काळात माणसाला बोहलं आणि निवडणूक आखाडा चुकत नाही बघा."

"हे खरं म्हना. पन —"

"पण नाही नि बिण नाही. इथे आरामात राहायचं."

"माझं काय जास्त गान्हानं नव्हतं हो ! आता लगीन झालं का बायकू घरात एकटीच न्हानार. म्हनलं तिला करमणूक नगं ?—"

"वा ऽ हवी तर."

"आयला, एकलीच ना—"

"बोला, स्पष्ट बोला पाटील."

"आता काय स्पष्ट बोलायचं आनिक. म्हनलं रेडिओ—"

"हात्तिच्या. एवढंच ना ? — दिला."

"आं ऽ ?"

"हो हो ! दिला. बघताय् काय असे." आणि साटलोटकराने त्वरेने एक ट्रान्झीस्टर पुढारी-पोराच्या हाती दिल्यावरच आश्चर्यानं उघडलेलं तोंड पटकन् मिटलं गेलं. आणि पाटलानं आपला मुक्काम तिथेच पसरवला. सकाळपासून हुकमांची नुसती फैर झडायची. साटलोटकर मुकाट्याने पाटलाचे लाड करीत राहीला. पाटील जिन्यावर उभा राहूनच खाणाखुणा करून काय हवं ते साटलोटकरास लागला. आणि थोड्या वेळातच ती ती गोष्ट पाटलाच्या येऊन पडे. एकदा तर स्नानासाठी चांगला टॉवेल म्हणून खाणाखुणा करून सांगितलं, आणि साटलोटकराचा गैर-त्याने चांगली पिवळीधमक दोन तोळ्यांची सर चिपाट-च्या गळ्यात अचूक टाकली.

कराने इतक्या निवडणुका पाहील्या. पार दिल्ली ते बारीक सारीक पुढारी पाहीले, काहीचा पळविल्यामुळे संपर्क आला पण असला कावेबाज माणूस नव्हता पाहीला. एकेक खटयाळ माणूस. तशात तरुण. इरसाल म्हणून सांगितलं होतंच चिपाटपूरकर मंडळींनी. ह्या 'पळवणुकी'त आपल्याला काही राहायचं नाही हे साटलोटकराने ओळखलं.

जवळ जवळ सर्व दोन सहस्रांची रक्कम पाटलाच्या लाडात खर्च व्हायला आली होती. पण त्याचे लाड कमी होण्याची काहीच चिन्हे दिसेनात. एकदा केव्हा चिपाटपूरचे इलेक्शन आटोपते आणि ही बला 'जनसेवे'तून बाहेर पडते असे साटलोटकरास होऊन गेले. तशात तुका भिंगाळेसारखा उजवा हात तुटलेला !

आणि चिपाटपूरची निवडणूक आटोपून तीन दिवस झालेत तरी मंडळी येण्याची काहीच चिन्हे दिसेनात. आणि हा इकडे पोरगेला पुढारी सुस्तीत चैन करीत होता. साटलोटकरास जेरीस आणीत होता. तो हलायची काहीच चिन्हे दिसेनात. या सौद्यात दिडकी सुटत नाही हे साटलोटकराने ओळखले.

आणि एक दिवस कंटाळून साटलोटकराने चिपाटपूरच्या पाटलाला 'जनसेवा' सोडून जाण्याचा निरोप धाडला. करणार काय?

दोन तासांत नवरदेवासारखा छानछोक पोषाख करून, अत्तरांचे फाये कानात कोंबीत चिपाटपूरचा पाटील आपल्या एका हातात ट्रान्झीस्टर कुथ्र्यासारखा खेळवीत साटलोटकरापुढे उभा राहीला. साटलोटकराची 'सीट' हलली. चरफडतच त्याने त्या बारक्या आणि बेरक्या पुढाऱ्याकडे तीक्ष्ण पाहून घेतले.

"बरंय् नारायणराव. लई आभार झाले." यावर साटलोटकर एक नाही की दोन !

"बाकी पार जावयासारखी सोय ठिवलां बगा. . .बारं, आता निगतो. रामराम."

"बराय्, उपकार होतील."

"अरेच्या !"

"आत्ता काय ?"

"एक न्हायलंय बगा."

"आणिक काय ? सांगून ठेवतो आता काहीच मिळायचं नाही."

"मालक, हितनं चालत जायचं लई जीवावर आलंया. जर तेवढं—"

"सायकल हवी म्हणा की !"

"वाऽ वाऽ ! हेच. हेच डोचकं त्या म्हाताऱ्याला आसतं तर इतका हेलपाटा पडला नसता." आता ही पीडा जात असेल तर सायकल देऊन एकदाची सोडवणूक करून घ्यावी. नाहीतर आपल्यालाच कुठेतरी पळून जायची वेळ येईल. या सूज्ञ विचाराने साटलोटकराने एक नवी कोरी सायकल 'जनसेवे'समोर हजर केली.

"ही घ्या. पुन्हा तोंड दाखवू नका."

"वाऽ ! कायतरी काय मालक." सायकलीवर एक टांग टाकीत चिपाटपूरचा पुढारी म्हणाला,

"आता कार्य आटोपल्यावर आशीर्वाद घ्यायला यावंच लागनार की हो !"

आणि वाक्य पूर्ण व्हायच्या आतच चिपाटपूरचा पाटील कोऱ्या गाडीवर स्वार होत गर्दीतून दिसेनासाही झाला.

या सौद्यात फायदा दमडीचा नाही तरी खिशाला चाट ट्राही एवढ्याच समाधानावर साटलोटकर स्वस्थ होता.






अनुक्रमणिका

चार दिवसांनी चिपटपूरची एक मोटर धूळ उडवीत 'जनसेवे'-समोर येऊन उभी राहिली. गुलालानं माखलेले एकेक पुढारी माणूस गाडीतून उतरू लागले. सगळे हंसत-खिदळत होते. अतिशय आनंदात होते. अशावेळी असावा तसा ओला आंबट वास दरवळत होता. त्यातल्या म्होरक्या पुढाऱ्यानें वाट काढून साटलोटकराकडे धाव घेतली. त्याला कडकडून मिठी मारली. टाळी देत तो म्हणाला, "मालक. द्या टाळी."

"काय म्हणता. छान झाली निवडणूक ?"

"छान ?.. अवो, ऐकतंच नव्हत कारटं. पन आलं ठिकानावर. समद्यास्नी गळ घातली तवा कांपरमाइज् केलंन् –"

"फार त्रास झाला बुवा" साटलोटकर आपल्याच नादात.

"त्रास होणारच. पण ठिकाणी आलं. शेवटी एकदोन निवडून आलो झालं. निवडणुकीचं कारनच न्हाय पडलं. म्हनलं तुमचा तरास तरी वाचला–"

"आँ ?" काहीतरी घोटाळा झाला आहे या भयंकर शंकेने साटलोटकर थरथरला.

"व्हय् जी.–"

"अहो, तुमचा पुढारी चांगला जावयासारखा ऐसपैस राहून गेला की हो !"

"ह्या: ऽ. कायतरी काय मालाक. पोरगं आलंच न्हाय तर न्हानार कुटलं."

"अरे पण –"

"त्येवढं दोन हज्जार परत करा म्हंतो."

"बापरे–" आणि साटलोटकरापुढे त्या पुढाऱ्यांसह सगळी आयुष्यभरीची 'जनसेवा' गरगरा फिरू लागली. आणि साटलोटकर धाडकन् निर्जीव बाहुल्यासारखा जमिनीवर आदळला !

साटलोटकर शुद्धीत आला तेव्हा तो 'जनसेवे'च्या तिसऱ्या मजल्यावर होता. भंवती घेणेकरी पुढारी साटलोटकराला जिवंत ठेवायची जीवापाड धडपड करीत असलेली दिसली. तुका भिगाळे पायाशी बसून होता. मालक शुद्धीत येता येताच त्याचा आनंद गगनात मावेना. पाय घट्ट पकडीत तो साटलोटकरास सांगू लागला,

"मालक, माजं पार चुकलं बगा. पन असं मालक हुनार न्हाई. लई बघितल्यात पन आभाळाच्या काळजाचा मानूस साटलोटकरच."

"काय झालं तुका–" विव्हळणारा साटलोटकर.

"पोरगी आपली समजून समदा हुंडा जावयाला दिला, आनिक काय हवंय् ? समदी व्याही मंडळी नुसती चाट झाली बगा !–"

"कुणाची मुलगी ? हुंडा ?. . ." साटलोटकरापुढे पुन्हा काजवे चमकले.

तुका भिगाळे भंवतालच्या गर्दीकडे तोंड करून सांगू लागला, "पाहीलंत, अस्सा मालक हवा. आजकाल मानसं मिळत्यात कुठं. लई मोठा मानूस–"

–इकडे साटलोटकर पुन्हा हळू हळू शुद्ध हरवत होता ! •••





अनुक्रमणिका

# शिव्या एक (किंवा अनेकही) देणे

—डॉ. बाळ गांगल

**एक बेफाम विनोदी ललित लेख**

**शिव्या** देणे ही ललितकला आहे, एवढेच नव्हे तर सर्वश्रेष्ठ ललितकला आहे! आणि असं असूनही शिवी देणारा कलावंत जन्मावा लागत नाही. जन्माला आलेला प्रत्येक माणूस ह्या कलेत कमी अधिक प्रमाणात पारंगत होऊ शकतो आणि असतोही. बाकीच्या सर्व कला परसापेक्षच असतात. 'उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा' म्हणून कलावंत आपल्या रसिकाची वाट पहात शतकानुशतकं थांबायला तयार असतो. पण 'शिव्या देणे' ही कला मात्र बऱ्याच वेळा विशुद्धपणे स्वान्तः सुखाय निर्मिली जाते आणि ज्याला आपण शिव्या देत असू त्याने त्या न ऐकल्या तरच बरं असं आपण बहुधा इच्छीत असतो! शिवीकलेचं हे व्यवच्छेदक वैशिष्ट्य आहे असं म्हणायला कोणाच्याही बापाची भीति नसावी! गोट्यांचा खेळ रंगात आलेला असताना जेवायला बोलावणाऱ्या आईसंबंधी मुलाच्या मनात येणारे विचार उकळणाऱ्या पाण्याप्रमाणे खदखदत असतात आणि त्याच्यावर शिव्यांचे बुडबुडेही बनत नि फुटत असतात. पण ते आईला ऐकू यावेत असं कोणात्याही मुलाला वाटत नाही. बॉससंबंधी कर्मचाऱ्याच्या मनात येणारे विचार, कॉपीचे कागद जय्यत तयार असूनही सुपरवायझरच्या करड्या नजरेमुळे ते बाहेर काढता येत नसल्याने कुचंबलेल्या परीक्षार्थी मुलाचे विचार, पैसे खर्चून हिंदी सिनेमा पहायला गेल्यानंतर निर्माता, दिग्दर्शक पटकथा-लेखक वगैरे मंडळींबद्दल आपल्या मनात उठणारे विचार, आणि अशा प्रकारचे असंख्य विचार शिव्यांचे जनक असतात.

शिवी ही जेव्हा स्वान्तः सुखाय निर्मिली जाते तेव्हा तिला विशुद्धतेचं, अनन्यसाधारण अस्तित्वावस्थेचं, एक वेगळंच 'डायमेन्शन' प्राप्त होतं, हे अमान्य करणारा आपल्या बापाचा मुलगाच नव्हे! अशा प्रकारे विशुद्धतेच्या चरम सीमेला, परसापेक्ष नसूनही 'पर तत्त्वा'ला, स्पर्श करणारी ही कला व्यवहारातही उपयोगी पडू शकते हेही ह्या कलेचं व्यवच्छेदक वैशिष्ट्य न म्हणायला कोणाची माय व्यायली आहे?

अहिंसेचं व्यवहारात आचरण करायचं असेल तर शिव्यांची नितांत आवश्यकता आहे. आता, शिवी देणं हीसुद्धा हिंसाच आहे असं काही लोक म्हणतील, पण एखाद्याचा राग आल्यावर त्याला कुऱ्हाडीनं तोडणं, किंवा आगरी भाषेत तोरून टाकणं, आणि त्याची आयमाय मनमुराद करणं ह्यातील दुसरा पर्यायच lesser evil म्हणून स्वीकारावा लागेल. काही कॉंग्रेसी स्थितप्रज्ञ सोडले तर आपल्यासारख्या सामान्य माणसाला राग हा येतोच. त्या रागाला शिव्यांवाटे safety valve जर आपण मिळवून दिला नाही तर क्रोधभावनेचं सप्रेशन होऊन आपल्याला वेड लागेल. तेव्हा 'शिवी कोणा देऊ नये' ह्या वडिलांच्या उपदेशात काहीही तथ्य नाही! शिवी



ही Charity प्रमाणे benefits him who gives and him who receives. शिवी देणाऱ्याचा राग शांत होतो हा त्याचा फायदा आणि ज्याला शिव्या दिल्या त्याचं 'टांगडं' प्रत्यक्षात तुटलं नाही किंवा डोचकं प्रत्यक्षात फुटलं नाही हा त्याचा फायदा! ज्या घरात माणसं उघड उघड एकमेकांना शिव्या देतात, त्या घरात परस्परप्रेम अधिक असतं हा अनुभव आहे. परस्परांना शिव्या न देता कुढत राहणारी माणसं एकमेकांचा खून करायला प्रवृत्त होतात हा मानस शास्त्र आणि संख्या-शास्त्र (Statistics) ह्या दोन्हीही शास्त्रांनी मान्य केलेला सिद्धांत आहे.

एका कवीनेच केलेल्या व्याख्येनुसार शिवीचा नंबर ओवीच्या वर लागेल. वर्ड्‌स्वर्थने काव्याची व्याख्या spontaneous overflow of powerful feelings अशी केलेली आहे. आणि हा spontaneous overflow [illegible] स्वरुपात व्यक्त होतो हे आदिकवी वाल्मिकीच्याच उदाहरणावरून स्पष्ट आहे. वाल्मीकि जेव्हा वाल्याकोळी होता तेव्हा येणाऱ्या-जाणाऱ्या वाटसरूला सरळ परशूच्या घावाने तोडीत असे, त्या रानटी अवस्थेतून सुसंस्कृत अवस्थेत आल्यानंतर प्रथम तो शिवी द्यायला शिकला. क्रौंच मिथुनापैकी एकाचा वध शिकाऱ्याने केल्याबरोबर वाल्मिकीच्या तोंडातून शिवी बाहेर पडली, ओवी नव्हे! तिचं स्वरुप ओवीचं होतं हा अपघात पण तिचा आत्मा शिवीचाच आहे. 'खूप खूप वर्षेपर्यंत तुला शांति लाभणार नाही' ऊर्फ 'तुझं तळपट होईल!' ही शिवीच काव्याचा मूलस्रोत आहे. पण वाल्मीकि म्हणजे खूपच जुना म्हणून आम्ही मराठीतील एकदोन कवींवर प्रयोग करून पाहिला. एक कवी थर्डक्लासने प्रवास करीत असताना आम्ही जणू काही अजाणता, पण नेमकं त्याच्या पायावर छत्रीचं टोक ठेवलं आणि आमचं एकशेपस्तीस पौंड वजन त्या छत्रीच्या दांड्यावर झोकून दिलं. 'स्स....तुझ्या....' मराठीतील उत्तमोत्तम शिव्या आम्हाला ऐकायला मिळाल्या. दुसऱ्या कवीला आम्ही काव्यगायनाला बोलावलं, बिदागी ठरविली आणि आभारप्रदर्शनाचे वेळी 'कवि श्री. अमुक अमुक यांनी उदार अंतःकरणाने त्यांना मिळालेली बिदागी आपल्या संस्थेला देणगी म्हणून देऊन टाकली आहे. तिचा आम्ही सहर्ष स्वीकार करीत आहो' असं भाषण करून स्वतःच टाळ्या वाजवल्या. सदर्हू कवीच्या मनात निर्माण झालेल्या powerful feelings चा उद्रेक निर्यमक, मुक्तछंद काव्याच्या स्वरुपात न होता शिव्यांच्याच स्वरुपात झाला. आम्हाला खूप आनंद वाटला. आमची थियरी खरी ठरल्याबद्दल! कविमहाशयांचा overflow संपल्यावर आम्ही त्यांची बिदागी त्यांना देऊन टाकली, हा भाग वेगळा!

शिवीद्वारे फक्त द्वेषच व्यक्त होतो असं नव्हे, तर खरं प्रेम शिवीशिवाय-बाहेर पडू शकत नाही. संत तुकारामाच्या विठ्ठलभक्तीविषयी कुणालाच शंका नाही. त्याला सुद्धा आपल्या दैवताशी विशेष जवळीक दाखवावीशी वाटली तेव्हा त्याने 'अरे विठ्या विठ्या, मूळ मायेच्या कारट्या!' म्हणून शिवी हासडली. बरं शिवी देणं ही कला काही फक्त पुरुषाधीन आहे अशातलाही भाग नाही. संत जनाबाई अभंगरचनेत होती त्याचप्रमाणे गाली-प्रदानातहि निष्णात होती हे उघड आहे. 'उभी राहोनी अंगणी, शिव्या देते दासी जनी!' भर अंगणात उभी राहून संत जनाबाई शिव्या मोजते आहे हे दृष्य मोठं विलोभनीय दिसलं असेल. 'रांडिच्या' म्हणून चुलीतलं फाटं घेऊन मुलाच्या मागे धावणारी आई 'Naughty naughty boy' म्हणून मुलाच्या गालावर लागेल न लागेलशी टिचकी मारणाऱ्या मम्मीपेक्षा अधिक प्रेमळ होती, ह्याबद्दल कुणालाच शंका नाही.

शिवी ही दलितांचा कैवार घेणारी आहे. संस्कृत आणि तद्भव सगळ्या भाषांमध्ये 'षष्ठी'ला केवढा अन्याय



## दोन कवड्या

**एका बाईचा एकाने**
**केसाने गळा कापला**
**ती केस कोर्टात गेली.**
**सगळ्यांचीच आफत आली.**
**केस भलतीच गुंतागुंतीची निघाली.**
**तुम्हाला मी सोडवतोच**
**वकील म्हणाला.**
**डोईवरचे केस काढून**
**तो कोर्टात हजर झाला.**

* *

**मुद्राराक्षसाने**
**एकदा विनोद केला**
**वामनाचा तिसरा पाय**
**डोक्यावर ठेवला**
**अन् राजा 'पाताळात' जाण्याऐवजी**
**पातळात' शिरला**

**—प्रकाश कामतीकर**

करण्यात आलेला आहे. इतर विभक्त्यांना मात्र कारक म्हणून मान्यता. षष्ठीला नाही! षष्ठीवर अन्याय!! लगेच मदतीचा हात पुढे घेऊन शिवी तयार. खरी कडक शिवी द्यायची तर षष्ठ्यंत शब्दाने सुरुवात झाली पाहिजे. उदा. 'तुझ्याXX XXX!' फुल्यांच्या जागी कोणते योग्य (शिष्ट भाषेत 'अयोग्य') शब्द भरावेत हे प्रत्येकाला माहीत आहेच. मुद्दा काय तर झणझणीत शिवीची सुरुवात षष्ठीने झाली पाहिजे. 'त्याची चांगली षष्ठी काढली' ह्या शब्दप्रयोगाची व्युत्पत्ति (की उत्पत्ति?) कोशकारानी काहीहि दिलेली असली तरी 'षष्ठी' काढली म्हणजे षष्ठी प्रत्ययांत शब्दांनी त्याची चांगली तासन्ती, चोडन्ती, भोसडपट्टी, खरडपट्टी, हजामपट्टी भादरन्ती काढली असा अर्थ असावा, हा आमचा नम्र कयास आहे. भगवद्गीतेत श्रीकृष्णांनी स्त्री, वैश्य आणि शूद्र ह्यांनासुद्धा परमगतीचे मानकरी बनवले आहे त्याचप्रमाणे



अनुक्रमणिका

शिवीसुद्धा फक्त उच्चवर्णीयांची मिरास म्हणून कधीच राहिलेली नाही. शिवीपुढे सर्व समान आहेत. एका संस्कृत सुभाषितात म्हटलेच आहे 'अयं निज: परो वेति गणना लघुचेतसाम् । गालिप्रदायकानां तु वसुधैव कुटुम्बकम्॥' शिवी देणाऱ्या माणसाला, ज्याला शिवी द्यायची त्याची जातकुळी माहीत असावी लागते. एवढेच नव्हे तर त्याहूनहि मौलिक माहिती असावी लागते. त्याचे पूर्वज मनुष्ययोनीतले होते किंवा त्याच्या घराण्यातील स्त्रियांचा चतुष्पाद प्राण्यांशी संबंध होता, ह्यासंबंधीहि त्याला खोलातील ज्ञान आवश्यक असते. आपल्या बेचाळीस पिढ्यांचा उद्धार व्हावा म्हणून भटजी बोलावून विधिपूर्वक श्राद्ध करावे तर फार खर्च येतो. पण शिवी देणारा माणूस आपल्या अतीत आणि अनागत बेचाळीस प्लस बेचाळीस चौऱ्यांयशी पिढ्यांचा उद्धार विनामूल्य करून देतो, एवढेच नव्हे तर साध्या आभारांचीहि अपेक्षा ठेवीत नाही आणि आपण सहसा ते मानीतहि नाही.

विश्वकुटुंबवादात (communism) म्हणूनच शिव्यांना अनन्यसाधारण वैशिष्ट्य आहे. साम्यवादी क्रांति करण्यात आपल्या खांद्याला खांदा लावून लढलेल्या सहकाऱ्याची जेव्हा पुढे Dictatorship of the proletariat खातर 'वाटलात' लावायची दु:खद पाळी आपल्यावर येते तेव्हा प्रथम त्याला बूर्ज्वा, रिव्हिजनिस्ट, प्रतिक्रांतिवादी, सुधारणावादी, कामगारक्रांतीचा मारेकरी, साम्राज्यवाद्यांचा हस्तक या आणि अशा दोलक्या शिव्या द्याव्या लागतात. पण एवढ्यावरच पुरले तर तो साम्यवाद कसला! दुसऱ्याला शिव्या काय कोणीहि देईल. भांडवलशाहीतहि तशी व्यवस्था असते. पण आठवडेच्या आठवडे झोपू न देणे, खायला न घालणे, एक्स्पर्ट वॉक्सर्सकडून नियमाने कणिक तिंबणे, थेंब थेंब पाणी समोर पडेल पण प्यायला मिळणार नाही अशी व्यवस्था करणे, इत्यादि प्रेमळ प्रकारानी आपल्या त्या सहकाऱ्याला स्वत:च्या दुर्गुणांची संथा देण्यात येते. रोज रोज त्याच्याकडून स्वत:वरील आरोपांची उजळणी (revision) करून घेण्यात येते आणि मग जनता न्यायालयासमोर तो गणपत्यथर्वशीर्ष म्हटल्याप्रमाणे घडाघडा स्वत:ला शिव्या देऊ लागतो. अशाप्रकारे स्वत:ला शिव्या देण्याइतकी जीवन्मुक्तावस्था प्राप्त झाली की मग फायरिंग स्क्वाड्समोर उभे करून ह्या नश्वर शरीरातून त्याची सुटका करण्याचं पवित्र कर्तव्य आपल्याला करता येतं. जनतेसमोर आलेल्या कबुलीजबावात गफलत राहू नये म्हणून क्रांतिद्रोह्याकडून आरोपांची उजळणी करून घेण्यात येते त्यालाच रिव्हिजनिझम ऊर्फ 'उजळणीवाद' असे नांव आहे किंवा काय ह्याविषयी साम्यवादीबंधूंनी ऊर्फ कॉम्रेड्सनी अवश्य संशोधन करावयास हवे! सारांश, कम्युनिझम् हा जर आजचा युगधर्म असेल (आणि तो आहेच ह्याबद्दल डाव्या किंवा उजव्या कम्युनिस्टांना शंका नाही) तर शिव्या हाहि युगधर्मच आहे!

निव्वळ व्यावहारिक पातळीवरूनसुद्धा आजचा तरुण गालिप्रदानात शास्त्रीय दृष्टिकोण कसा आणून सोडतो ह्यासंबंधीचा एक किस्सा आम्हाला आठवतो. शहरातला एक मुलगा खेडेगावात गेला. त्याचं तिथल्या एका मुलाशी भांडण झालं. 'साल्या, भडव्या, भांचोद्, मादरचोद' वगैरे नेहमीच्या सरावातल्या शिव्या देऊन झाल्या आणि शहरी मुलाचा स्टॉक संपला. खेडेगांवातला मुलगा 'तुझ्या रे आँयला'... म्हणून एक एक शेलकी शिवी काढू लागला. एकच क्षण! शहरी मुलगा चमकला नि मग लगेच 'तुझ्यायला इक्विलॅटरल ट्रँगल, आयसॉसिलेस ट्रँगल' वगैरे भूमितिशास्त्रीय सिद्धांत,' त्यानंतर तुझ्यायला ए स्क्वेअर प्लस टूएबी प्लस बी स्क्वेअर,' इत्यादि बीजगणितीय सूत्रे आणि त्यानंतर 'एचटूओ, एचटू एस ओ फोर, सी ए ओ सी एलटू....'वगैरे, वगैरे वगैरे! त्याला माहीत असलेल्या सर्व शास्त्रांतील ज्ञानाच्या आधारे शिव्या देऊ लागला. ज्ञानी पुरुषाचा विजय होतो हे त्रिकालाबाधित सत्य असल्यामुळे खेडवळ मुलगा शेवटी हरला. शाळा शिकल्याने शिव्याहि जास्त येतात अशी त्याची खात्री झाली. तो नियमाने शाळेत जाऊ लागला. पुढे तो वकील झाला असे म्हणतात.

काव्याचे जसे उत्तम, मध्यम, अधम असे प्रकार असतात तसे गालिप्रदानाचेहि असतात. ज्यात व्यंग्यार्थ मुख्य असतो ते उत्तम काव्य आणि तीच उत्तम शिवी. उत्तम प्रकारचे गालिप्रदान करण्यात बायका पटाईत असतात. श्री. द. पां. खांबेटे ह्यांचा 'बायकांची भाषा' हा लेख जिज्ञासूंनी मुळातच वाचून पहावा. एखाद्या बाईचं घर अत्यंत टापटिपीचं असेल तर दुसरी बाई म्हणेल, 'तुमचं आपलं बरं हो! टिपटॉप्! कारण डिस्टर्ब करायला कुणी नाही!' वरवर पाहिलं तर स्तुति पण आत निंदा ऊर्फ शिव्या. बाईच्या निपुत्रिकपणावर बोट ठेवलेलं! अचूक!! हीच बाई उपरोक्त दुसऱ्या बाईकडे गेली की म्हणेल, 'ईश्श करायच्यंत काय फ्रीज नि रेडिओग्रॅम! मुलं हीच खरी घराची शोभा!' म्हंजे आपल्या घरी फ्रीज आणि रेडिओग्रॅम आहेत ही माहिती आणि शिवाय दुसऱ्या बाईच्या घरात पोरवडा आहे हा गर्भित टोमणा! ह्याच धर्तीवर मध्यम आणि अधम गालिप्रदानाच्या सोदाहरण व्याख्या कराव्या. अभ्यासूना सोडवण्याजोगे उदाहरण म्हणून तो भाग तसाच ठेवीत आहे.

साहित्यातहि शिव्यांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. ज्याच्या लिखाणात एकहि शिवी नाही तो श्रेष्ठ साहित्यिक कदापि होऊ शकणार नाही असं एका सुप्रसिद्ध टीकाकाराने म्हटलेलेच आहे. ज्यांनी शिव्यांचा चपखल उपयोग केला ते मराठीत श्रेष्ठ कथाकार आणि कादंबरीकार ठरलेले आहेत. त्यांची नांवं उगाच मेन्शन करीत नाही. आम्हांला शिव्या बसायच्या!

शिव्यांमध्येहि नित्यनूतनाची आवश्यकता असते. कथेप्रमाणे त्यातहि आवर्त निर्माण झाले की एक वैतागपूर्ण बीभत्स गारठा जाणवू लागतो. चारसोबीस, बंडल आदमी, वैतागवाडी, चमचा, पंछी, चालू, वासू, हुंग्या, वकवास, बेकार, भिक्कार भंकस, 'हॅत्, हडत् किंवा हुडत्,' कचरा, राडा, वगैरे नवनवीन आणि बद्धर्थघन अपशब्दांची निपज नित्यशः होत राहिली पाहिजे. कोणीतरी श्रेष्ठ पुरुष म्हणाला होता की एखाद्या देशातील तरुण गाणी कोणती म्हणतात ते मला सांगा म्हणजे मी त्या देशाचं भवितव्य सांगेन. त्यानुसार आम्हीहि म्हणतो की कुठल्याहि देशातील आधीच्या दहा वर्षांतील आणि नंतरच्या दहा वर्षांतील शिव्यांचा कोश माझ्यासमोर आणून द्या आणि त्या देशाची प्रगति चालू आहे की नाही हे मी तुम्हाला सांगेन. ज्या देशात नवीन शिव्यांची निपज होत नाही, त्याची सर्वांगीण प्रगति खुंटलेली आहे असे खुश्शाल समजावे.

सारांश काय, शिव्यांमध्येहि आवर्त उपयोगाचे नाहीत. त्यासंबंधीचा एक किस्सा सांगून हे शिवीपुराण थांबवतो. साताऱ्याकडचे लोक अस्सल शिवीबाज म्हणून प्रसिद्ध आहेत. एकदा एका सातारी पाटलाकडे एक पाहुणा आला होता. बाजूला पाटलाचा सहा वर्षांचा मुलगा खेळत होता. आणि खेळताना आपल्या खेळगड्याला सारखी शिवी देत होता. काही वेळानं पाटील वैतागला नि त्याने आपल्या मुलाच्या कानपटीत एकच 'तानून' दिली. पाहुणा म्हणाला, 'जाऊ द्या हो पाटील, पोराची जात! येते शिवी तोंडात!' पाटील म्हन्ले, 'मी बी तेच म्हंतोय् की! एक ती एकच शिवी देतोय्. भाडचाला आन्खी घापाच इथा बी आठवनाशा झाल्यात् का काय्? थूत् तुज्या र म्हंतो मी?' आपला सहा वर्षांचा मुलगा एकाच शिवीच्या आवर्तात सांपडू नये म्हणून जेवढी जागरूकता सातारी पाटील दाखवतात तेवढी जरी लेखकूंनी आपल्या लिखाणासंबंधी दाखविली तरी वाङ्मयातील आवर्त शमतील! पण लक्षात कोण घेणार! •

'मुंबईतली धुळवड'



महापालिका निवडणुकांची जंगी तयारी चालू झाली !







अनुक्रमणिका



# खून आणि आत्महत्या

— पंडित क्षीरसागर

**सकाळी** जाग आली. आणि जगाची एकदम चीड आली. सालं हे जग एकदम नालायक आहे. या जगाचा निकाल लावला पाहिजे. काहीतरी करायला हात शिवशिवू लागले. जो जो दिसेल त्याला गोळी घालावी असं वाटू लागलं. बस्‌ ! ठरलं ! आज कोणाला तरी गोळी घालायची. खून करायचा. त्याखेरीज चैन पडणार नाही.

आज नाही मी चहा करणार ! रोजच सकाळी मी कां म्हणून चहा करावा ? आणि चहाच्या आधी केंद्रावर जाऊन दूध आणावं ? आमच्या हिनं एकदाही केंद्रावरून दूध आणलं नाही. अरे, आता आठवलं. एकदा आणलं होतं. त्या दिवशी मला जरा बरं नव्हतं. म्हणून ती दूध आणायला गेली होती. पण जिना चढताना पातळात पाय अडकून पडली. व दुधाच्या दोन्ही बाटल्या फुटल्या. ती केव्हढ्यानं किंचाळली ! आनंद व सुमा धावतच जिन्याजवळ गेले. आई पडली आहे हे पाहून दोघेही आनंदानं टाळ्या वाजवू लागले. मलाही ते दृश्य आवडलं. मीही दोन टाळ्या वाजवल्या. नेहमी नेहमी मीच काय म्हणून जिन्यावरनं पडावं ? जिन्याची एक पायरी अंमळ सुटली होती. म्हणून माणसाचा तोल जात होता. हां, जरी मी खूप वेळा पडलो होतो तरी दुधाची बाटली मात्र फोडली नव्हती कधी. ती मला नेहमी हसत होती ना ? बरी पडली. चांगली खोड मोडली. पण माझ्या टाळ्या ऐकल्यावर तिनं एवढ्या रागानं माझ्याकडं पाहिलं की मी जरा घाबरलोच! खरं म्हणजे नवऱ्यानं बायकोला घाबरू नये. पण कां कोणास ठाऊक, मला घाबरायला होतं. म्हटलं, जिरली ना तिची ? मग टाळ्याच कशाला वाजवायला पाहिजे ? नाही वाजवल्या तरी तिची खोड मोडली ती मोडलीच. चाळीतले सर्व लोक तिच्याकडे मजेने पहात होते. त्यामुळं ती अधिकच खजील झाली होती. खरं म्हणजे कधीकधी मला वाटायचं, आपणच तिला जिन्या-







वरनं ढकलावं. पण हिंमत नाही व्हायची. म्हटलं, चला बरं झालं.

ती आठवण आली आणि आताही खूप हसू आलं. डोळ्याला अगदी पाणी आलं. च्यायला, या डोळ्यातल्या पाण्याची फारच मात्र आहे ! आनंद झाला तरी येतं आणि दुःख झालं तरी येतं. पण जाऊ द्या ते. दूध आणायचं, चहा करायचा आणि बाईसाहेब उठल्या की त्यांना द्यायचा. काय तिच्या बापाचा नोकर आहे की काय मी? पण मी गरीब पडलो ना ? साधा कारकून. आणि ती श्रीमंत. बापाचं घर होतं. पण त्याचा तोरा आम्हाला कशाला दाखवायचा ? तिच्या बापानं ते घर नाहीना दिलं मला ? पण नाही. घर म्हणजे वतन समजते ती. म्हणजे तिचा बाप वतनदार झाला. झाला असेल. इथं कोणाला किंमत आहे ?

आज तर आपण ठरवलं बुवा. दूध आणायचं नाही की चहा करायचा नाही. बायको चिडली की आपण सरळ तिचा खून करणार. घाबरतो की काय ? तसं काठीनं तिला मारलं तरी चालेल. पण खून केला म्हणजे पीडा एकदम खलास ना ? एकदम मोकळं मोकळं वाटेल. ती रागवायला लागली की एकदम गोळी घालणार. अरेच्च्या ! पण पिस्तुल कुठं आहे आपल्याजवळ ? नसलं तर नसलं. असा डरतो की काय ! सुरी तर आहे ना ! ती सुरी एकदम तिच्या छातीत खुपसणार आणि सरळ घराबाहेर पडणार. मुलाना गांवातच मावशीकडं सोडणार. मग मी मोकळा. एकटा. स्वतंत्र. बस्स् ! ठरलं. आज आपण खून करणार.

उठलो. शिळ्या दुधाचा चहा केला. फक्त एकच कप. माझ्यापुरता चहा घेतला. अन् फक फक् सिगरेट ओढत बसलो. एवढ्यात घड्याळाचा गजर झाला. केवढ्यांदा दचकलो. दुधाची वेळ सकाळी ५ ते ६ होती. म्हणून रोज सकाळचा ५ चा गजर लावून ठेवत होतो. नेहमीप्रमाणं बायको म्हणाली, "अहो उठलात का ?"

मी बोलणारच नव्हतो. पण म्हटलं, तिचा खून झाल्यावर थोडीच येणार आहे बोलायला ?

म्हटलं, "उठलो ना."

"मग दूध आणायला जा."

"नाही जाणार."

ती पुन्हा घोरायला लागणार होती. पण माझं उत्तर ऐकून तिची झोप उडाली.

"काय म्हणाला ? नाही जाणार ?"

"होय."

"याचा अर्थ काय ?"

"अर्थ सरळ व सोपा आहे. तुला समजायला हरकत नाही."

बापरे ! बोलायला चांगलं जमत होतं की ! इतके दिवस कसं नाही जमलं ? मागंच जमायला पाहिजे होतं. म्हणजे बायकोचा रुबाब नसता वाढला ! हरकत नाही. आता दाखव म्हणा रुबाब !

"मी स्पष्ट विचारते. तुम्ही दूध आणणार की नाही ?"

"मी स्पष्ट सांगतो. मी दूध आणणार नाही."

"कां ?"

"कां म्हणजे ? माझ्या मनाची खुषी. तू कोण विचारणार?"

"मी तुमची बायको."

"माहीत आहे मला. आणि चाळीलाही माहीत आहे."

"वाद नको. उठा. बाटल्या घ्या आणि दूध आणा."

"नाही आणत."

"आणता की नाही ?"

ती झटकन् उठली. व तिने कमरेला पदर खोचला. व माझ्यापुढ कमरेवर हात ठेवीत रुक्मिणीसारखी उभी राहिली.

"दूध आणा म्हणते ना ?"

"नाही आणणार."

आता मात्र ती चिडली. व कोपऱ्यातला झाडू घेऊन माझ्यावर धावली. ते मला अपेक्षितच होतं. कारण नेहमीच तसं घडायचं ना ? म्हणून मी आधीच सुरी माझ्याजवळ आणून ठेवली होती. ती मी हातात कटय़ारीसारखी धरली व म्हटलं, "ये. पुढं ये."

सुरी पाहिल्यावर ती दचकली. घाबरून जागच्या जागी उभी राहिली. म्हणाली, "खून करता की काय माझा ?"

---

**अजून दुकानं उघडली नव्हती. कोपऱ्यावरचं हॉटेल उघडलं होतं अन् शेजारचं पानाचं दुकानही. महंमद तिथं बसला होता. बस्सं ठरलं. त्याचाच खून करायचा.... उधारी थकली म्हणून फार सतावतो नाही !**

---

"हो."

"काय म्हणालात ?"

"मी तुझा खून करणार आहे. तुला काय वाटलं ?"

"मला काय वाटलं सांगू का ?"

"सांग, भितो की काय ?"

आणि साली बायको भलतीच चपळ निघाली, माझ्या हातावर झाडू मारून तिनं सुरी दूर उडवली. मग सुरीवर पाय देऊन उभी राहिली व म्हणाली, "या आता पुढं."

सालं आता पुढं कशाला जायचं ? झाडूचे फटके खायला. म्हणून जरा विचार केला. मग म्हटलं, बर. बरं. नाही खून करू देत तर राहू दे."

मग बायकोला दूर ढकललं. सुरी खिशात टाकली व बाहेर पडलो. सुरी मुद्दाम बरोबर घेतली. सालं आपलं डोकं अग्ज फार फिरलं आहे. कुणाचा तरी खून केल्याखेरीज शांत होणार नाही. चांगला रामप्रहरी बायकोचा खून होत होता. पण सालीनं नाट लाव[illegible] आता बाहेरच कुणाचा तरी खून करावा.

अजून दुकानं उघडली नव्हती. कोपऱ्यावरचं हॉटेल उघडलं होतं. हॉटेलशेजारचं पानाचं दुकानही उघडलं होतं. व महंमद दुकानात बसला होता. ठरलं. महंमदचा खून करायचा. उधारी थकली म्हणून







मग मी जोर करुन हात उगारला व मालकाच्या छातीच्या दिशेनं सुरी खुपसली. पण सुरी मालकाच्या छातीत गेलीच नाही. मालकानं मध्येच माझा हात पकडला. व जोरानं पिरगळायला सुरुवात केली. साला घुणं पिळावं तसा हात पिळीत होता. काय रग लागली हाताला. सुरी केव्हाच खाली गळून पडली होती. ती सुरीच चांगली नसावी. केव्हाही हातातून खाली गळून पडते. सुरी खाली पडल्यावर खून कसा करायचा बुवा !

खानावळीच्या मालकात मात्र ताकद अचाट हं ! त्यानं मला दोन्ही हातांनी उचललं आणि सरळ बाहेर फेकलं. फुटपाथवर आपटलो. ठिकठिकाणी खरचटलं. पण म्हटलं, एवढं व्हायचंच. खून करायचा म्हणजे एवढं सोसलंच पाहिजे. परत खानावळीत गेलो. मालक ओरडला, "परत कां आला ? चालते व्हा."

"होतो. होतो. एवढी मिजास कोणाला पाहिजे. माझी सुरी घ्यायची आहे."

"घ्या आणि कटा."

"कटतो. झुरळं खाण्यासाठी थांबत नाही."

माझं बोलणं मालकाला चांगलंच लागलं. तो परत धावून आला. तेवढ्यात मी बाहेर पडलो होतो. मग ठरवलं, वाटेल त्या माणसाचा खून करुन चालत नाही. खून करण्यास योग्यच माणूस पाहिजे. तसा योग्य माणूस म्हणजे हेडक्लार्क.

मग मी वेळ न गमावता ऑफिसमध्ये गेलो. मला ऑफीसला उशीर झाला होता. हेडक्लार्क अशी संधी शोधतच असतो. नाहीतरी तो माझ्यावर कां कोणास ठाऊक फारच जळतो. इतर कारकूनांना फार सवलती देतो. ते त्याची खाजगी कामं करतात ना? मी कधीच करत नाही. त्यानं मला एकदा एक खाजगी काम सांगितलं तर मी साफ म्हटलं मला जमणार नाही म्हणून. तेव्हापासून खार खाऊन होता माझ्यावर. एखादा कारकून रजेवर असला आणि आपण त्याचे महिनाभर काम पाहिले तर पगाराच्या वीस टक्के अलौवन्स मिळतो. कमीत कमी दहा टक्के तरी देतातच. पण हा खाडू हेडक्लार्क, मी कितीतरी वेळा महिनेन् महिने दुसऱ्यांची कामं पाहिली, तरी मला अलौवन्स देऊ नये अशी शिफारस करीत होता. त्यामुळं मला असा अलौवन्स कधीही मिळाला नाही. गणगे त्या हेडक्लार्कचं नांव. नांवाप्रमाणं गणंगच होता.

हेडक्लार्कनं म्हटलं, "किती वाजले ?"

मी म्हटलं, "अकरा."

"किती उशीर झाला ?"

"अर्धा तास."

"कां."

आता मात्र चिडलो. म्हणालो, "कारण विचारायचं काम नाही. उशीर झाला. कबूल केलं."

"शिंगं फुटलेली दिसतात, मिस्टर."

"असतील. त्या शिंगांचा तुम्हाला त्रास नाही ना ?"

आता तोही चिडला.








फार सतावतो. त्याच्या दुकानासमोर गेलो व म्हणालो, "महंमद एक पिळाहत्ती पाकिट लाव."

महंमद म्हणाला, "पहला बिल दस रुपये हुआ है. वो दे दो. फिर पाकीट मिलेगा."

मला हेच पाहिजे होते. खिशातल्या खिशात सुरी कुरवाळीत मी म्हणालो, "हम किधर भाग जाता है क्या ? दस रुपयेकी तो बात है. पहले तारीखको दे दूंगा. पहले पाकिट तो देव."

"नही. पहले पैसे. फिर पाकीट."

आता मात्र मी चिडलो. एकदम सुरी काढून त्याच्यावर रोखली. व म्हटलं, "दस रुपयेके लिये अब्रू लेना है ."

सुरी पाहिल्यावर महंमद चमकला. चांगली जिरली बेटयाची. पण एवढ्यात त्याने माझ्या हातावर फटका मारला. सुरी दूर उडाली. मग महंमदनं मलाही टोला मारला. मीही सुरीशेजारी जाऊन पडलो.

च्यायला काय माणूस आहे. पाकिट नसलं द्यायचं तर नको देऊ. मारतो कशाला ? म्हटलं, हाच कोण लागून गेला आहे. ह्याच्यापेक्षाही चांगला माणूस मिळेल खून करायला. अजून सबंध दिवस मोकळा आहे. म्हणून मी पुढं निघालो.

आता रहदारी सुरू झाली होती. मी सगळ्याकडे निरखून पहात होतो. खून करायला कोणता माणूस चांगला आहे यासाठी. काही झालं तरी आज खून केलाच पाहिजे. कोणाचा तरी मुडदा पाडलाच पाहिजे. पण जो तो आपल्याच नादात चालला होता. आणि काही कारण नसता कोणाचाही खून करणं बरं नव्हतं. विनाकारण खून कसा करायचा बुवा? ते आपल्याला जमायचं नाही.

आता बराच वेळ झाला होता. ऑफीसला जायची वेळ होत आली होती. ऑफिसचं नांव डोळ्यासमोर आल्याबरोबर मी झक्कपैकी उडी मारली. सापडला. माणूस सापडला. खून करायला माणूस सापडला. हेडक्लार्कचा खून करायचा. फार छळतो साला. आज आपण त्याला जिवंत ठेवत नाही. ठरलं.

ऑफीसला जायच्या आधी जेवण्यासाठी एका खानावळीत शिरलो. आज जेवायला घरी जायचं नाही. बायको झाडू घेऊन अंगावर धावते म्हणजे काय ? आम्हाला काही मानापमान आहे की नाही ? जेवायला बसलो. भाताच्या मुदीवर आमटीची वाटी पालथी केली. सालं आमटीत झुरळ पडलेलं. फार राग आला. मोठ्यानं ओरडलो, "मालक इकडे या."

"काय झालं ?" काळाकभिन्न मालक समोर आला.

"हे काय आहे ?"

"काय आहे ?"

"आमटीत झुरळ पडलं आहे."

"फेकून द्या."

"काय ?"

"झुरळ."

"आणि तसंच जेवू ?"

"काय हरकत आहे ?"

हे मात्र टू मच झालं. डोकंच फिरलं. खिशातली सुरी काढली आणि मालकाच्या छातीवर रोखली.

"काय समजलात मालक ? आमटीत झुरळं खाऊ घालता. उद्या उंदीर खाऊ घालाल."

शेजारचा जेवणारा म्हणाला, "घालतोच. अहो कधी कधी आमटीत उंदराचं पिल्लू असतं."

मी म्हणालो, "आणि तरीही तुम्ही इथं जेवता ?"

"काय करणार ? एवढ्या कमी पैशात कुठंही जेवण मिळत नाही."

मालक ऐटीनं म्हणाला, "ऐकलं. मला गिऱ्हाईकाची ह्यामुळंच कधीही कमतरता पडत नाही."

आता मात्र मी मालकावर खूप चिडलो. म्हणालो, "मालक, ईश्वराची प्रार्थना करा."

"कां ? ईश्वराची प्रार्थना न करताही माझं चांगलं चालतं."

"पण आज करा. मरण्याआधी देवाचं नांव घ्यावं म्हणतात."

"मरण्यासाठी मी खानावळ नाही घातली. जगण्यासाठी व लोकांना जगवण्यासाठी घातली आहे."

"बास. जादा बडबड नही मंगता."

"बरं."

"तयार."

"हो तयार."

खानावळीत इतर जेवणारे लोक माझ्याकडं आदरानं पहात होते. मी मालकाचा खून करावा अशी त्या सर्वांची इच्छा मला त्यांच्या डोळ्यात दिसत होती. खरं म्हणजे त्यांच्यातल्या कुणीतरी आधीच मालकाचा खून करायला पाहिजे होता. पण म्याड लेकाचे ! मी येईपर्यंत वाट पाहिली.



अनुक्रमणिका








# फिल्म इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया, पुणे

## प्रवेश मिळवू इच्छिणाऱ्यांकरिता सूचना

संस्थेच्या ता. १ जुलै १९६८ या शैक्षणिक वर्षापासून नियमितपणे सुरू होणाऱ्या पहिल्या वर्षाच्या खालील शिक्षणक्रमासाठी अधिकृत छापील फार्मावर उमेदवाराकडून अर्ज मागविण्यात येत आहेत.

१) **दिग्दर्शन** (Direction) – तीन वर्षे; **कमीत कमी शैक्षणिक पात्रता:** आर्टस् किंवा सायन्सची पदवी किंवा तत्सम पदवी प्राप्त. **वय:** १९ ते ३० वर्षे १।७।१९६८ ला पूर्ण. **एकूण जागा:** १३

२) **चित्रपट कथा लेखन** (Screenplay Writing) –तीन वर्षे **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** – आर्टस् किंवा सायन्सची पदवी किंवा तत्सम पदवी प्राप्त. **वय:** १९ ते ३० वर्षे १।७।१९६८ ला पूर्ण. **एकूण जागा:** ७

३) **चलत्चित्र छायालेखन** (Motion Picture Photography) तीन वर्षे, **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** – पदार्थ विज्ञान शास्त्र व रसायन शास्त्र, किंवा तत्सम विषय घेऊन इंटरमिजिएट (ज्या उमेदवारानी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाहि तीन वर्षाच्या शास्त्राच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल मात्र त्यांनी पदार्थ विज्ञान शास्त्र व रसायन शास्त्र हे विषय त्या परीक्षेसाठी घेतलेले असावेत) किंवा फाइन आर्टस् (पेंटिंग)ची विश्वविद्यालयाची किंवा अधिकृत मान्यता असलेल्या संस्थेची पदवी किंवा डिप्लोमा. मॅट्रिकनंतर डिप्लोमाचा अभ्यासक्रम दोन वर्षाचा पूर्ण केलेला असावा. **वय:** १७ ते ३० वर्षे १।७।१९६८ ला पूर्ण. **एकूण जागा:** १०

४) **ध्वनी मुद्रण आणि ध्वनी स्थापत्यशास्त्र** (Sound Recording And Sound Engineering)–तीन वर्षे. **कमीत कमी शैक्षणिक पात्रता:** पदार्थ विज्ञान शास्त्र, रसायनशास्त्र, व गणित किंवा तत्सम विषय घेऊन इंटर मिजिएट उत्तीर्ण (ज्या उमेदवारानी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या शास्त्राच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल मात्र त्यांनी पदार्थ विज्ञान शास्त्र, रसायन शास्त्र व गणित हे विषय त्या परीक्षेसाठी घेतलेले असावेत.) **वय:** १७ ते ३० वर्षे १।७।१९६८ रोजी पूर्ण. **एकूण जागा:** १०

५) **चित्र संकलन** (Film Editing) – दोन वर्षे. **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** – इंटरमिजिएट आर्टस् किंवा सायन्स किंवा तत्सम परीक्षा उत्तीर्ण. ज्या उमेदवारानी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल.) **वय:** १७ ते ३० वर्षे १–७–१९६८ ला पूर्ण. **एकूण जागा:** १०

६) **चित्रपट अभिनय** (Film Acting)–दोन वर्षे. **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** – मॅट्रिक्युलेशन किंवा तत्सम परीक्षा इंग्रजी हा एक विषय घेऊन उत्तीर्ण. हिंदीचे कामचलाऊ ज्ञान आवश्यक. विशेष लायकीच्या स्त्री उमेदवारास ही अट शिथील केली जाईल. **वय:** १६ ते २५ वर्षे मुलींकरीता आणि १८ ते २५ वर्षे मुलांकरीता १।७।१९६८ ला पूर्ण. **एकूण जागा–२०** (१० पुरुषांकरीता, १० महिलाकरीता.)

**प्रवेश परीक्षा** – पुरुष उमेदवार / स्त्री उमेदवार विश्वविद्यालयीन / बोर्डाच्या परीक्षेस एप्रिल / मे / जून १९६८ ला परीक्षेस बसला / बसली असेल आणि त्याचा / तिचा निकाल संस्थेच्या त्या वेळच्या प्रवेश परीक्षेपर्यंत मिळू शकला नाही तर त्याने / तिने संस्थेच्या त्यावेळी होणाऱ्या प्रवेश परीक्षेपर्यंत तो / ती ज्या संस्थेत शिक्षण घेत असेल त्या संस्थेच्या प्राचार्यांचे / प्रमुखाध्यापकांचे त्याचा निकाल लागे तो पर्यंतच्या मुदतीचे प्रशस्तीपत्र सोबत असले पाहिजे. प्रवेश परीक्षेत निवडलेल्या उमेदवारास तात्पुरता प्रवेश दिला जाईल. पण त्याला नियमानुसार आपण आवश्यक ती परीक्षा उत्तीर्ण झालो आहोत असे ३१ जुलै १९६८ पर्यंत लेखी पुरावे सादर केले पाहिजेत. हे न झाल्यास त्याचा / तिचा तात्पुरता प्रवेश रद्द केला जाईल. आणि त्याने / तिने भरलेली फी परत केली जाणार नाही.

विविध शिक्षणक्रमाच्या अभ्यासासाठी प्रवेश परीक्षेच्या आधारावरच प्रवेश दिला जातो. दिग्दर्शन, चित्रपट कथालेखन, चलच्चित्र छायालेखन, ध्वनीमुद्रण, ध्वनी स्थापत्यशास्त्र व चित्र संकलन या परीक्षांकरीता लेखी व तोंडी परीक्षा द्यावी लागेल. लेखी परीक्षा मुंबई, दिल्ली, कलकत्ता व मद्रास येथे **१२ मे १९६८** (रविवार) या दिवशी घेतली जाईल. या लेखी परीक्षेत लायक गुण मिळविणाऱ्या सर्व उमेदवारास तोंडी परीक्षेसही बसावे लागेल व ती परीक्षा संस्थेत **१८ ते २२ जून १९६८** या काळात होईल. चित्रपट अभिनयाकरिता ठेवलेल्या प्रवेश परीक्षेत आवाजाची चाचणी व पडद्यावरच्या हालचाली याबाबत विशेष लक्ष पुरविले जाईल. या चाचणी परीक्षा मुंबई, दिल्ली, कलकत्ता व मद्रास येथे जून १९६८ च्या सुरूवातीस होतील. निश्चित तारखा उमेदवारांना योग्य वेळी कळविल्या जातील.

**शिष्यवृत्त्या** – विविध विषयांच्या बाबतीत विशेष आवड आणि उत्साह दाखविणाऱ्या आणि समाधानकारक प्रगती करणाऱ्या उमेदवारांना खास सवलती दिल्या जातील. केंद्र सरकार, आंध्रप्रदेश सरकार, आसाम, बिहार, गुजरात, केरळ, महाराष्ट्र, म्हैसूर, मध्य प्रदेश, ओरीसा, पंजाब, पश्चिम बंगाल व मद्रास राज्ये आणि संगीत नाटक संगम यातर्फे लायक विद्यार्थ्यांसाठी पारितोषिके व शिष्यवृत्त्या ठेवलेल्या आहेत.

**हॉस्टेल** – मुलां-मुलींकरीता संस्थेमार्फत वेगवेगळी हॉस्टेले चालविली जातात.

**अर्ज कसा कराल** – संस्थेच्या माहिती पत्रकासोबतच अर्जाचा नमुना शिक्षणक्रमांची अधिक माहिती, प्रवेश परीक्षा, शिष्यवृत्त्या इ. इ. सर्व ती माहिती पुरविली जाते. हे सारे साहित्य **प्राचार्य, फिल्म इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया, पुणे–४** या पत्त्यावर १ रुपयाची क्रॉस पोस्टल ऑर्डर पाठवून मागविता येईल. क्रॉस पोस्टल ऑर्डर 'प्राचार्य, फिल्म इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया, पुणे' यांच्या नावानेच असावी. आपल्या विनंती पत्रासोबतच २५×१८ सें मी. लांबी रुंदीचा स्वतःचा पत्ता लिहिलेला व ३० पैशाचे तिकीट लावलेला लखोटाही असावा. पोस्टल ऑर्डर व स्वतःचा पत्ता लिहिलेले तिकीट लावलेलं पाकीट असल्याशिवाय कोणत्याच प्रकारचा पत्रव्यवहार केला जाणार नाही. १ रुपया मनीऑर्डर किंवा चेकने पाठविल्यास तो स्वीकारला जाणार नाही.

**उमेदवाराने आपला संपूर्ण प्रवेश अर्ज माहितीपत्रकात दिलेल्या प्रमाणे ५ रुपयाच्या पोस्टल ऑर्डर समवेत १ एप्रिल १९६८-पर्यंत संस्थेच्या कचेरीत पाठवावेत.**

davp 571(47)/67








"कोणापुढं बोलता ?"

-"गणंगापुढं."

"खबरदार. आजची रजा मांडतो. साहेबापुढं रिपोर्ट करतो. दंड करायला लावतो."

आता माझं मायंच भडकलं. म्हणालो, "ए गणंग्या, सांगतोस कुणाला ? रजा मांड. हा चाललो."

"चालला कुठं. एक्स्प्लनेशन द्या."

"देणार नाही."

"दिलं पाहिजे."

"अबे जा. तुझ्यासारखे खूप पाहिलेत."

आणि मग मी लगेच खिशातून सुरी बाहेर काढली. व म्हटलं, "गणंग्या, तुझी शंभर वर्षे भरली. देवाचं नांव घे."

सुरी पाहिल्यावर हेडक्लार्क टरकला. म्हणाला, "बरं नका एक्स्प्लनेशन देऊ. जा जागेवर बसा."

"बसतो. पण आतापर्यंत बुडवलेल्या माझ्या दहा टक्के अलौवन्सचं काय ?"

"१० च काय पण २० टक्के अलौवन्स रेकमेंड करतो. तुमचा सगळा अलौवन्स देतो. पण तेवढी सुरी बाजूला ठेवा."

"अरे हाट ! सुरी बाजूला घेण्यासाठी उगारली नाही. खून करणार आहे मी तुझा."

"नको पाया पडतो मी तुमच्या."

आणि तो खरोखरच पाया पडला. त्याची विजारच ओली झाली होती. बोबडी वळली होती. पण साले रामू व महादू शिपाई मध्ये कडमडले. त्या दोघांनी मला केव्हा धरलं हे समजलंच नाही. त्यांनी मला माझ्या टेबलाजवळ आणून बसवलं.

हेडक्लार्क साहेबाच्या चेंबरमध्ये गेला. बाकीचे कारकून माझ्याभोवती गोळा झाले. म्हणाले, "शाबास. बहाद्दर आहेस. चांगली जिरवली त्या पोक्याची."

मी म्हटलं, "मग ? माणसानं सहन करायचं तरी किती ?"

हेडक्लार्क बाहेर आला. साहेबानं मला चेंबरमध्ये बोलावलं. व म्हटलं, "तुम्हांला महिनाभर रजा दिली आहे. घरी जा. शांत रहा. पूर्ण विश्रांति घ्या. डोक्याला मनस्ताप होऊ देऊ नका. आता जा."

मी ऑफिसबाहेर पडलो. साहेब मला वेडा समजले की काय ? समजू दे. पण त्या गणंगेची चांगली जिरवली. आता कुणाला त्रास द्यायचा नाही.

आता दुपारचे बारा वाजले होते. दिवसभर वेळ कसा काढायचा? मग गेलो मलबार हिलवर. चांगला चार पांच तास तिथं झोपून राहिलो. नंतर गांठली चौपाटी. पुन्हा मस्तपैकी वाळूत झोपून राहिलो. थंड वारा वहात होता. वेटं डोकंही शांत व्हायला लागलं होतं. आणि एकदम आश्चर्य वाटलं. सकाळपासून कोणाचा तरी खून करावा हा विचार मनात कसा आला असावा ? काही समजेना. जरा विचार केल्यावर पटलं की कोणाचाही खून करणं आपल्याला जमायचं नाही. मात्र आज दिवसभर मजा आला एवढं खरं. पण नंतर रात्री घरी जायच्या वेळेस पोटात गोळा आला. सकाळी बायको चिडली होती. जेवायलाही घरी गेलो नव्हतो. साली मग रात्री भाजून खाईल. मग याला उपाय काय ? आहे. एक उपाय आहे. खून जमत नाही ना? मग आपणच आत्महत्या करायची. नाही तरी कोणाचा खून केला तर फाशीच होणार ना ? तेव्हा मरायचं तर आत्ताच मेलेलं काय वाईट ? वा ! उत्तम मार्ग सापडला. द्यावं शरीर समुद्रात झोकून. ठरलं. आत्महत्या म्हणजे आत्महत्या. नो चेंज. नो लाड. उठलो अन् सरळ समुद्रात चालू लागलो. गळ्यापर्यंत पाणी आलं. आणखी आत गेलो. अन् खालची जमीन सुटली. अन् गटांगळ्या खाऊ लागलो. नाकातोंडात पाणी जाऊ लागलं. जीव काय घाबरायला लागला. छे छे. आत्महत्याही आपल्याला जमायची नाही. परत माघारी फिरलो.

एकूण खून काय अगर आत्महत्या काय दोन्हीला पण मोठं धैर्य लागतं हेच खरं ! ते आपल्यापाशी नाही. कबूल करतो. सत्य कबूल करायला कसली लाज ?

आता घरी जाऊन बायकोची माफी मागावी हेच खरं. उठलो अन् सरळ घराच्या दिशेनं चालू लागलो.

●●●


Statement about ownership and other particulars about newspaper "Dipavali" Monthly

FORM IV (SEE RULE 8)

| | | | |
|---|---|---|---|
| 1. | Place of Publication ... ... | Dalal Art Studio<br>42, Kennedy Bridge, Bombay-4. |
| 2. | Periodicity ... | Monthly, on 1st of every month. |
| 3. | Printers' Name ... | Shri Dinanath Damodar Dalal. |
| | Nationality ... ... | Indian |
| | Address ... ... ... ... | 42, Kennedy Bridge, Bombay-4. |
| 4. | Publishers' Name, Nationality and Address ... | As per 3 above. |
| 5. | Editor's Name, Nationality and Address ... | As per 3 above. |
| 6. | Names and addresses of individuals who own the newspaper and partners or shareholders more than one percent of the total capital. ... ... ... ... | Shri Dinanath D. Dalal,<br>Sole proprietor.<br>No partners or Shareholders. |

I, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Date 1-3-1968

D. D. Dalal
Signature of publisher.







मैत्रीण तिच्याजवळ आली आणि तिला डिवचत म्हणाली, "अग, पहा तरी!"

"काय पाहू म्हणतेस?"

'तो बघ, मिशीवाला पुरुष!' नोराने समोर पाहिले. पण तिला फक्त दोन दाढीवालेच दिसले.

"अग, तू त्याला पाहिलेस काय?"

"त्याला म्हणजे कुणाला?"

"इरॉलला!"

"इरॉल कोण बाई हा?"

त्या बाईने नोराकडे अशा काही चमत्कारिक दृष्टीने पाहिले की जणु नोरा ही वेगळयाच जगातून इथे आलेली आहे. त्यानंतर तिने "इरॉल म्हणजे इरॉल फ्लिन् असे सांगितले. तरीहि नोराच्या चेहऱ्यावरची रेषाही हलली नाही. नंतर तिने पेगीवरील बलात्काराची, खटल्याची सर्व माहिती तिला सांगितली. "असेल" असे तुटक उत्तर देऊन व मला त्यात काहीही रस नाही असे सांगून नोराने स्वतःची सुटका करून घेण्याचा यत्न केला. पण "निदान त्याच्याकडे एकदा पहा तरी" असे मैत्रिणीने सांगितले. नोराने पाहिले. पण "मला काहीही खास वाटले नाही." उलट ग्रेग यावेळी काय करीत असेल असा विचार तिच्या मनात आला. "इरॉलकडून चुंबन–अहाहा!" अशा शब्दात मैत्रीण तिला इरॉलच्या मोठेपणाचे वर्णन करून सांगत होती. नोरा मात्र ग्रेग भेटल्यावर त्याला इरॉलचा हा किस्सा ऐकवायचा असे ठरवून गप्प बसली.

ग्रेग भेटल्यावर त्याला तिने पेगीच्यावर इरॉलने केलेल्या बलात्काराची हकीकत सांगितली. त्यावर तो म्हणाला "मला ह्याविषयी जबरदस्त शंका आहे. इरॉलसारख्या माणसांना स्त्रियांवर बलात्कार करावा लागत नाही. उलट स्त्रियांपासूनच स्वतःचा विनयभंग होऊ नये म्हणून सावध रहावे लागते. त्याच्या ह्या बोलण्यावर नोरा इतकी खूष होते की, ती भर रस्त्यात ग्रेगचे चुंबन घेते. तिला स्वतःला आवरता येत नाही. बाजूने जाणारी एक मुलगी शेरा मारते "प्रेम बरं का ! प्रेम!"

"होय प्रेमच!" नोराचे मन हुंकारते.

## नकार ! नकार !!

सिगरेट स्टॉलवर काम करीत असताना नोराची आणि "बस्टर वाइल्स"ची ओळख झाली. त्याचा विनोदी स्वभाव तिला आवडला. मध्यमवयाचा तो टकल्या माणूस ! पुढे नोराची नोकरी सुटली. अचानकपणे बस्टर तिला एका हॉटेलात भेटला. तिचा फोन नंबर घेताना तो तिला म्हणाला "मी इथेच असतो. इरॉल फ्लिनकडेच असतो. एखाद दिवशी तू जेवायला ये ना आमच्याबरोबर" नोराने नकार दिला.

नोराने सतत नकारच दिला. ग्रेग भेटत असे. त्यामुळे इरॉलचा तो ससेमिरा तिला टाळताही येत होता. इरॉलने नोराचे सावज सिगरेट स्टॉलवरच निश्चित केलेले असावे. कारण "बस्टर

**मरण सोसावे...**



**...परि पहिले चुंबन घ्यावे**

वाइल्स" त्या स्टॉलवर फक्त नोरालाच भेटत होता. तिच्याचकडून माल खरीदत होता. ती नसली तर वाट पहात थांबत होता. आणि पुन्हा भेटल्यानंतर तोच तिला आता जेवणाचे आमंत्रणही देत होता. नोरा मात्र टाळीत होती. पण बस्टरचे फोन्स मात्र येतच होते. एकदा त्याने फारच आग्रह केला. नोरा म्हणाली "तू म्हणतोसच आहेस तर मी येईन, पण माझी मैत्रीण **मार्दाही** बरोबर येईल."

बस्टरने ते मान्य आणि केले. तो इरॉल स्वतःची गाडी घेऊन नोराला व मार्दाला न्यायला आला. इरॉलची गाडी विदेशी होती. आणि बटणाच्या सहाय्याने तिच्या फ्रंटसीटचे सुखशय्येत रूपांतर करता येऊ शकत होते. बस्टरने प्रथम फेरीतच हा जादा तपशील पुरविला होता.

## वा !! सुंदर–अप्रतिम !!

मुलोलॅण्ड इस्टेटीत नोराने पाऊल टाकले. इरॉल पोहण्याच्या तलावाजवळ एका खुर्चीत बसला होता. त्याच्या हातात कसले तरी हस्तलिखित होते. समोर विस्तीर्ण तलाव, त्यातल्यातले ते चमचम करणारे निळसर पाणी, वर नीलाकाश आणि शेजारी एक

निवेदक — प्रभाकर अत्रे

सुंदर मानवी शिल्प हे सारे पाहून नोराच्या मुखातून सहजच उद्गार बाहेर पडले "किती सुंदर! अप्रतिम!!"

बस्टर हसला. पण नोराच्या मनातला खरा भाव मात्र त्याला समजला नाही. 'सुंदर' हा अभिप्राय केवळ इरॉलला उद्देशून असावा असा त्याने (सोयिस्कर) समज करून घेतला.

परिचय, पेयपान झाल्यावर इरॉलने स्वतः नोरा व मार्दा ग

एरॉल फ्लिन
आणि
नोरा ॲडिंग्टन
यांची

# प्रीत पिउनिया मी हि रिती

अशी ही
एक
प्रेमकथा (च)

[ "एरॉल फ्लिन" ह्या हॉलिवुडच्या सुविख्यात नटाने आपले आत्मचरित्र "माय् विकेड् विकेड् वेज्" ह्या नावाने प्रसिद्ध केले. एरॉल् फ्लिन् हा हॉलिवुडचा नुसताच नट नव्हता तर तो एक देखणा "पुरुष" होता. "द मॅन" असाच त्याचा वारंवार उल्लेख केला जात असे. एरॉलने आयुष्यात अनेक व अनेकविध उपभोग घेतले. घेतले पण त्याचे दायित्व नाकारले नाही. सर्व अनुभवातून तो घडत गेला. आलेले आयुष्य स्वीकारीत गेला. आणि ह्या अनुभवांच्या जोवावर त्याचे आयुष्य "सुरस व चमत्कारिक" वाटावे इतके रोमांचकारी झाले आहे. त्या सुरस, सरस, चमत्कारिक (वाटणाऱ्या) रोमांचकारी आत्मचरित्राचा परिचय मी ह्यापूर्वी 'दीपावली' च्या वाचकांना चार लेखांकातून करून दिला आहेच. त्यावेळी मी असे म्हणालो होतो की ज्यांना शक्य असेल त्यांनी मुळातच ते चरित्र वाचावे. झलक सादर केली होती मी ! आज त्याची दुसरी पत्नी नोरा ऑंडिगटन ह्या रूपवतीने लिहिलेल्या "एरॉल ॲण्ड मी" ह्या आत्मचरित्रपर पुस्तकातून तिला "एरॉल फ्लिन् कसा दिसला" व "जाणवला" ह्याचीही अशीच एक झलक येथे सादर करीत आहे. माणसाच्या व्यक्तित्वाला अनेक स्तर असतात, अनेक कोन असतात आणि म्हणूनच वर्षानुवर्षे जवळ राहिलेल्या माणसालाही एखादी 'व्यक्ति' गवसल्यासारखी वाटते, पण गवसतेच असे नाही. 'एरॉल् फ्लिन'च्या व्यक्तित्वाचा शोध एका निराळ्या चष्म्यातून (व कोनातून) घेण्याचा हा एक प्रयत्न आहे. कलावंतांचे व्यक्तित्व पुष्कळदा गुंतागुंतीचे असते. ते गवसतेच असेही नाही. पण शोध मात्र अति आल्हादक असतो असे मला वाटते. हा शोध तुम्हालाही आल्हादक वाटेल असा मला विश्वास वाटतो. आता वाचा ही झलक———लेखक ]

किती जवळ...



किती दूर...

**"कोण हा इरॉल?"** [ पहिली ( अप्रत्यक्ष ) भेट ]

'हॉल ऑफ् जस्टिस' च्या इमारतीतल्या सिगरेट स्टॅंडवर विक्रेती म्हणून नोरा काम करीत होती. पेगी सॅटर्ली ह्या स्त्रीने इरॉलवर बलात्काराची (स्टॅच्युटरी रेप) फिर्याद केली होती तो खटला त्याच इमारतीत चालू होता. पण त्या खटल्याशी वा इरॉल्शी नोराला काय कर्तव्य होते? तिला त्या आधीच तिचा प्रियकर भेटला होता. ग्रेग होते त्याचे नाव. आठवड्याच्या अखेरीस तो तिला येऊन हमखास भेटत होता. ग्रेगच्या सहवासातल्या अमर क्षणांच्या स्मृति तिला आठवडाभर पुरत होत्या. पण———

अचानक एक दिवस तिच्याच स्टॉलवर काम करणारी एक







अनुक्रमणिका

दचकली. तिने वस्टरला खुणावले व वस्टर, ती व मार्दा गुपचुप सटकण्याचा प्रयत्न करू लागली. एकदम इरॉल ओरडला, "जरा थांबा!"

कितीतरी फूट फिल्म वाया गेली. (असावी) इरॉलने नोराची भेट मागितली. कदाचित शूटिंगमधल्या 'युद्ध' प्रसंगात आपण 'कामी' येऊ असेही तिला तो म्हणाला. ती हसली. "पण मला भेटच" असे तो म्हणाला, "कदाचित उद्याची रात्रही अखेरचीच......."

"ग्रेग आला नाही तर———" नोरा त्याला म्हणाली.

* *

## "स्वर्गीय" सायंकाळ

इरॉलच्या भेटीनंतर दुसऱ्या दिवशी ग्रेग आला. नोरा त्याला भेटली. बोलली. पण ते सारे बोलणे इतके रुक्ष व नीरस व कृत्रिम वाटले की ह्याच माणसावर आपण प्रेम करीत आहोत की काय असा संभ्रम तिला पडला. ग्रेग गेला. इरॉलच्या वतीने 'अॅलेक्स'चा फोन आला. तो जणु उताराच वाटला तिला. ती गेली. मग इरॉल आणि नोरा एका मोठ्या बारमध्ये गेली. तेथे प्रथमच तिने इरॉलसाठी शॅंपेन घेतली. घेण्याचे तंत्र ठाऊक नव्हते. अनुकरण करून ते साधले. इरॉल बोलत राहिला. त्या बोलण्यात संगीताची नादमयता, लय होती. नोरा भारावून ऐकत राहिली. ऐकता ऐकता एकदम तिच्या मनात विचार आला की इरॉलला आपल्याशी लफडे हवे आहे तर!

तिचे मन भरकटत आहे हे इरॉलच्या चाणाक्ष नजरेला जाणवले. तो म्हणाला "कसल्या चिंतेत आहेस मुली?"

नोराने श्वास घेतला. मन घट्ट केले आणि ती इरॉलला म्हणाली, "मी कॅथॉलिक आहे. कुमारिका आहे. एक ना एक दिवस पांढरा पोषाख घालून चर्चमध्ये विवाहासाठी जायचे व सन्मानपूर्वक परतायचे हे माझे स्वप्न आहे. तेव्हा मी तुमची शय्यासोबतीण होईन अशी जर तुमची कल्पना असेल तर तो तुमचा गैरसमज आहे."

नोराच्या निर्व्याजतेने व अश्रापतेने इरॉलही भारावला. तो तिला म्हणाला, "काळजी करू नकोस मुली. मी तुझे पावित्र्य राखीन. धक्का लावणार नाही. शांत हो."

नोरा शांत झाली. त्याने आपल्या हाताचे चुंबन घ्यावे अशी इच्छा तिने व्यक्त केली. 'इरॉल' म्हणणार असलीस तर घेईन." असे तो म्हणाला. तिने तसे म्हटले. त्याने हाताची असंख्य चुंबने घेतली.

ती सायंकाळ जणु स्वर्गीय बनून आली होती.

## अडचण आणि उपाय–

इरॉलचे फोन येत. नोरा नेहमीच होकार देत नसे. असाच एकदा नकार दिला! पण कां? इरॉलने विचारले, "पार्टीला यायला चांगला पोषाख नाही." तिने सत्य सांगितले. इरॉलने पैसे पाठवले. तिने कपडे खरीदले. नटून इरॉलच्या घरी गेली. इरॉलने तिला हिऱ्याची माळ दिली. तिने नाकारली. पण त्याने सक्तीने ती तिच्या गळयात घातली. पार्टीला घेऊन गेला. त्या अनुभवात गोडवा होता. त्यामुळे ती दोघे वारंवार भेटत राहिली. पण त्यामुळे नोराच्या नौकरीत खाडे होऊ लागले. उत्पन्न घटू लागले. तेव्हा तिने इरॉलजवळ वस्तुस्थिति मांडली. व "गाठीभेटी बंद" असे सांगितले. "दुसरा मार्गच नाही." ती म्हणाली.

इरॉल गंभीर झाला. फेऱ्या घालता घालता तो तिला म्हणाला "मार्ग आहे. आपल्या हातातलाच आहे. अगदी तुझे आहे तुजपाशी!"

"कोणता मार्ग?"

"तुला हवीय् नौकरी." मला हवी आहे एक सेक्रेटरी—तू हो म्हणजे झालं. "ठरलं?"

"ठरलं!"

"अट फक्त एकच!"

"कोणती?"

"तू मला कधीही साहेब म्हणून म्हणता कामा नये."

"मान्य आहे साहेब—नाही नाही मिस्टर फ्लिन्—मला इरॉलच खरं तर म्हणायचं आहे."

अडचणीतून उपाय सुचला—निघालाही!!

## इमान

सेक्रेटरी म्हणून नोरा काम करू लागली. कधी कधी काम नसे. नुसत्याच गप्पा. इरॉल हा नुसता स्त्रियांच्या घोळक्यात वावरत असे असे नाही. चित्र–दुनियेतली फार मोठ मोठी माणसेही त्याच्या भोवती वावरत. त्यांच्या खूप गप्पा चालत. हास्य विनोदही होत असे. भोवतालचे जग सजीव करणे, आनंदाने भरून टाकणे इरॉलला कर्तव्य वाटे. माणसातला व माणसांचे वेड असलेला असा तो माणूस होता. **अर्नो** नांवाचा त्याचा लाडका कुत्रा होता. त्याची त्याच्याशी दोस्ती होती. इरॉल म्हणतो, "ह्या जगात इमानदारीबद्दल मी फक्त अर्नोचाच हवाला देऊ शकतो." आणि मग नोराकडे वळून तो म्हणाला "आणि तुझाही." ह्या अर्नोला घेऊन तो विमानातून, आगगाडीतून, हॉटेलातून क्लृप्त्या लढवून प्रवास करीत असे. पण अर्नो हा त्याला हवा असेच. "कुत्र्यांना मज्जाव" ही पाटी जणु तो विचारातच घेत नसे.








आपला सारा बंगला दाखविला. बंगल्यातल्या एका खोलीत उत्तम पैकी पेंटिंग्ज होती. त्यातले एक **मॅनेटचे**, एक **वॅन गॉचे** आणि तिसरे **गॉगिनचे** होते. एका खोलीत इरॉलने केलेल्या प्रवासात त्याने खरीदलेल्या सुंदर सुंदर वस्तूंचा संग्रह होता. एकात त्याच्या सागरी जीवनाचे दर्शन घडविणारा संच होता.

"गॉगिन हा माझा खास आवडता चित्रकार" इरॉल म्हणाला. मार्दाने हुशारीने मान हलविली. पण गॉगिनचे नाव नोराने जवळपासच्या साइन बोर्ड पेंटर्समध्येही न ऐकल्याने 'गॉगिन कोण?' म्हणून चौकशी केली. त्याने तपशीलवार माहिती दिली. ताहिती आणि गॉगिनची चित्रे आणि त्या स्मृति ह्यांना इरॉलच्या जीवनात फार मोठे व महत्त्वाचे स्थान होते हे त्याच्या निवेदनात स्पष्ट होत होते.

इरॉलने दोघींना शय्यागारात नेले. शय्यागारातल्या एका शय्येचा आकार एका विशाल जहाजाचा होता. आणि जवळच एका जहाजाची काचेची प्रतिकृती होती. त्याच्या एका प्लेटवर कवितेच्या काही ओळी लिहिलेल्या होत्या:

One ship sails east, the other west
By selfsame winds that blow
it's the set of the sails — and not the rules
that decides the way to go.

—नोराला त्या काव्यपंक्तींचा अर्थ, त्यामागची भावना समजून घ्यावीशी वाटली.

"आवडल्या काव्यपंक्ती?"

"होय! अतिशयच आवडल्या!"

"त्या तुला काय सुचवितात?"

"धाडस?"

"बरोबर! धाडसाची कशाशीही तुलना होऊ शकत नाही. धाडस माणसाला सतत सजीव राखते."

## हा शिमगा नव्हे—फॅशन




"तुम्हाला सागराचे जबर आकर्षण दिसते."

"खरंय् ते! सागराचे जगच वेगळे आहे. तिथे माणसाला खूप शांतता मिळते आणि तो विचारही करू शकतो. कधी सागरपर्यटन केले नाहीस?"

"नाही," असे नोराने सांगितले खरे. पण त्या सागरी अनुभवांबद्दल मात्र तिच्या मनात कुतूहल व आनंद भरलेला होता. त्यामुळे इरॉलने तिला सांगितले की, कटालिनाचा एकमेव अनुभव जरी तुझ्या गाठीला असला तरीही एक ना एक दिवस तू सागरपर्यटनाला जाशील. वर निळे आकाश आणि खाली पाणी—भूमीचे दर्शन म्हणून घडणार नाही.

जेवणे झाल्यावर गप्पा रंगल्या. इरॉलला एकान्त हवा होता. त्याला नोराशी बोलायचे होते. म्हणून त्याने मार्दाला बस्टरबरोबर घोडशाळा पाहण्यासाठी पिटाळले. मार्दा नाखूषच होती "मी पुन्हा कधीतरी पाहीन" असे तिने सांगून पाहिले. पण सुटका झाली नाही. बस्टर इरॉलच्या 'तालमीत' तयार झालेला माणूस होता. त्याला संकेत ठाऊक होते इरॉलचे. आणि त्यासाठीच तर त्याने तो योजनाबद्ध (जेवणाचा) डाव टाकला होता.

शिळोप्याच्या गप्पा सुरू झाल्या. इरॉल नोराला म्हणाला, "तुझ्या मनात काय चालू आहे मुली, सांग की चाचा इरॉलला!" इरॉल त्यावेळी पसतीस वर्षांचा होता. नोरा फक्त अठरा वर्षांची होती.

नोराने त्याला आपली आणि ग्रेगची प्रेमकथा सांगितली. जांभया देत इरॉल म्हणाला, "प्रेम! प्रेम हं! पण प्रेमच आहे याला पुरावा काय?"

"प्रत्यक्ष पुरावा! म्हणजे शारीरिक असंच की नाही?"

"होय! इतर गोष्टींबरोबर तोही हवाच की!"

नोराने आपला अनुभव सांगितला. ग्रेग दिसला की, हृदय धडधडतं, घशात आवंढे येतात वगैरे———

"मलाही मग तसंच होतं" ———इरॉल म्हणाला.

बोलता बोलता तो एकदम गंभीर झाला. प्रेम—लग्न—सुखी संसार, ह्याबद्दलची काही तत्वज्ञानपर वाक्ये तो बोलून गेला. "माणसाने प्रत्यंक गोष्ट आयुष्यात निदान एकदा तरी करून पाहिली पाहिजे. कधी कधी एक अनुभव सुद्धा फार महागात पडतो. प्रत्येक अनुभव नवीने, काहीशा आधाशीपणानेही घेतला पाहिजे. भोगला पाहिजे. पचविला पाहिजे. मनाची कवाडे कधी बंद करता कामा नयेत. शिवाय—" आणि अचानक तो थांबला. शूटिंगची आठवण झाली त्याला. म्हणाला "शूटिंग पाहायला येणार?"

नोराने शूटिंग कधी पाहिलेच नव्हते. तिने होकार दिला. गाडीत नोरा व इरॉल मागील बाजूस बसले होते. बस्टर व मार्दा पुढील जागी बसले होते. रस्त्याने ती गाडी जात असताना माणसे इरॉलकडे पहात. आत डोकावत. इरॉलला मात्र ते फारसे 'हलवू' शकत नव्हते.

—शूटिंगमध्ये नोरा रंगली. घड्याळाकडे लक्ष जाताच ती








ह्या अर्नोने अनेकदा त्याला अवेळी व अस्थानी प्रकट होऊन गोत्यातही आणले होते, पण त्याला तो घेऊनच जाई.

एका नौकेच्या प्रवासात अर्नो त्याच्या बरोबर होता. पण सकाळी उठून पाहतात तो अर्नो बेपत्ता झाला होता. "कदाचित माशांच्या वासावर ह्याने पाण्यात तर उडी मारली नसेल?" तेच घडले होते. पण त्यात अर्नोचा जीव गेला होता. त्याला वार्ता कळली. ओळखीसाठी त्याला बोलावले गेले, तेव्हा त्याने नकार दिला. तो म्हणाला 'मला ते शक्य नाही. तो जसा माझ्याजवळ असताना दिसत होता तसाच तो मला स्मृतीत जपून ठेवू दे. त्याची आजची अवस्था मला सहन होणार नाही. वृत्तपत्रे म्हणाली "ह्याच कुत्र्याच्या प्रेमापायी त्याने अनेक गोंधळ उडवून दिले होते. पण आता हा त्याला ओळखायला जायला काही तयार नाही बघा!"



इरॉलकडे येणाऱ्या कुठल्याच स्त्रीचा नोराने कधी मत्सर केला नाही. पण मेरी ॲन हाइड तेथे येणार होती तेव्हा इरॉल तिला म्हणाला, "मेरी येणार आहे."

"वा! फारच छान—मला तिला भेटायला आवडेल."

"पण तिला तसंच वाटेल असं मात्र मला वाटत नाही."

"पण कां?"

"तू अलिकडे इथेच, माझ्याकडे अधिक वेळ असतेस. तुला स्त्रीचा स्वभाव ठाऊकच आहे."

"मत्सर! तिला माझा मत्सर वाटतो, असंच ना?"

प्रत्यक्षात ॲन हाइड आली तेव्हा नोराला वाटले की, हिने माझा मत्सर काय म्हणून करावा? एक केसांची श्रीमंती फक्त मजजवळ आहे. बाकी सर्व बाबतीत हीच सुंदर आहे की!

इरॉलचे दिवस ठीक चालले होते. पण त्याच्या कुठल्याही लफड्यांबाबत काहीही न बोलण्याचे, चौकशीही न करण्याचे धोरण नोराने स्वीकारले होते. आठवडा बरा जाई. पण शनिवार रविवार खायला उठत. शेवटी शेवटी त्याची तगमग वाढे. इरॉलने शेवटी नोराला आपल्याच बंगल्यावर रहायला बोलावले. आईने परवानगी दिली. इरॉलच्या घरी उत्तम वाचनालय होते. चित्रालय होते. त्याने तिला शेक्सपियर वगैरे नामवंत लेखक वाचायला सांगितले. चित्रप्रदर्शने दाखवली व इरॉलला संगीताचेही जबर आकर्षण होते. "संगीताची नोटेशन दिलेली कार्डे मला काही समजत नाहीत. पण वाद्यातून सूर निघू लागले की मन कसं आंदोलने घेऊ लागतं. उन्मनी अवस्था प्राप्त होते" असे तो म्हणतो.

**लक्ष्मण रेषा—**

इरॉलने नोराला टेनिस खेळायला शिकविले. तिचा विश्वास वाढत होता. जीवनाच्या कक्षा विस्तारत होत्या. मग एक दिवस त्याने **लास वेगास**ला जायची कल्पना काढली. "येशील?" तो म्हणाला. आणि मग नोराच्या चेहऱ्यावरचे भाव जाणून घेऊन म्हणाला, "वेगवेगळ्या खोल्यातून राहण्याची व्यवस्था केली जाईल. तुझे पावित्र्य राखले जाईल." नोराच्या आईने अनुमति दिली. दोघेही विमानाने लास वेगासला गेले. शेजारच्या खोल्यांतून त्यांची राहाण्याची व्यवस्था झाली. जुगारात नोराला भरपूर पैसा मिळाला, तेव्हा इरॉल तिला म्हणाला, "तू एवढ्या पैशांचे करणार आहेस काय?"

"हरामाचाच पैसा आहे हा! तुम्ही जर सद्गृहस्थासारखे वागला नाहीत तर स्वतःच्या पैशांनी मला सुखरूपपणे घरी परतता येईल."

इरॉल पहातच राहिला. त्याच रात्री मधल्या दाराने इरॉलने नोराच्या खोलीत प्रवेश केला. परंतु नोराच्या मनाचा निर्धार पाहून व दिल्या शब्दाची जाणीव घेऊन तो तिचे फक्त चुंबन घेऊन परत गेला.

अशाच जाणीवेने त्यांनी मग बऱ्याच सफरी केल्या. नोराला निसर्गाची आवड होती. स्वभावतः ती अबोल होती. उलट इरॉलला




खूप बोलावेसे वाटत असे. सर्वच प्रश्नांची उत्तरे देऊ शकणारी माणसे इरॉलला आवडत नसत. आपण सारखे कुणाला काही तरी सांगत रहावे, शिकवीत रहावे, असे त्याला वाटे. त्यामुळेच त्याची व नोराची रास जमली. ती त्याची जणु हुशार विद्यार्थिनी ठरली. तो तिला नेहमी म्हणायचा, "तू जी नाहीस ती आहेस असे दाखविण्याचा ढोंगीपणा करीत नाहीस ना म्हणून मला आवडतेस. अन्यथा इथे हॉलिवुडमध्ये मुखवटे धारण करून हिंडणारी माणसेच फार".

"इरॉलचे पिणे आणि त्याच्या तोंडचे फाजील विनोद ह्या दोन गोष्टी मला अजिबात आवडत नाहीत. पण त्यांना आवर घालण्याचा मात्र मी अजिबात प्रयत्न करीत नाही." असे नोरा एके ठिकाणी म्हणते.

**पहिले भांडण–**

इरॉलच्या खाजगी भानगडीत आपण पडायचे नाही अशा धोरणाने नोरा वागत होती. त्यामुळे संघर्षाचे प्रसंग फारसे आले नाहीत. कधी कटु शब्दांची फैर झडे. पण लगेच क्षमा याचना अश्रु पुसणे, चुंबने हा प्रकार होई. भांडण असे ते नसे.

एक दिवस मुलोलॅण्ड फार्मवर पार्टी देण्याची कल्पना इरॉलने मांडली. कारण काहीच नव्हते. त्या पार्टीची यजमानीण म्हणून नोराने काम करावे असे त्याने सुचविले. तिने विरोध करून पाहिला. पण त्याने मानला नाही. खूपशा स्त्रिया–मुली जमल्या. इरॉलबरोबर केव्हा ना केव्हातरी त्या स्त्रियांचा घनिष्ट संबंध आला असलाच पाहिजे ह्याबद्दल नोराची खात्री होती. त्या दिवशी इरॉल खूप प्यायला. वातावरण प्रसन्न होते. नृत्य, पेयपान वगैरे चालू होते. नोराही खुषीत होती. पण इरॉल अचानक गायब झाला. नोरा अस्वस्थ झाली. तिला तो अपमान वाटला. उपहास जाणवला. तिने सहज गॅलरीतून पाहिले. इरॉल कुणातरी स्त्री-बरोबर रखवालदाराच्या घरातून बाहेर पडत होता. ती स्त्री, कपडे, केस सारखे करीत होती. इरॉल तिचा कोट सारखा करीत होता. नोराने ते पाहिले. नोरा अतिशय अस्वस्थ झाली. पहाटे तीनचा सुमार होता. माणसे परतली होती. दिवे मालवले गेले होते. नोरा अंधारातच बसून राहिली. त्या मुलीला घेऊन इरॉल गाडीपाशी गेला. त्याने अलेक्सला विचारले, "मिस, अॅडिंग्टन घरी गेली असेल ना?" त्याने "नाही" म्हणताच इरॉलने अॅले-क्सला तिला पोहोचवायला सांगितले व तो नोराकडे वळला. नोराच्या हातात मद्याचा पेला होता. तो तिने इरॉलच्या अंगावर भिरकावला. नोराच्या हातून ते प्रथमच घडत होते. इरॉलने क्षमा मागितली. 'पुन्हा असे वागणार नाही.' असे तो म्हणाला. घरी परतताना नोराच्या मनाची एक खात्री झाली होती. "ती इरॉलवर प्रेम करू लागली होती. त्याने दुसऱ्या स्त्रीबरोबर प्रेमाचे चाळे करू नयेत असे आता तिला वाटू लागले होते. पण स्वतः बरोबर मात्र ती त्याला ते चाळे करू देणार नव्हती. लिली डामिटाबरोबरच्या त्याच्या वैवाहिक संबंधाबद्दल त्याने












नोराजवळ काढलेले उद्गारही तिच्या चांगले स्मरणात होते. "लिलीला वाटते मी तिचा मनाने व शरीराने गुलाम व्हावे. मला ते मान्य नाही. मला संपूर्णपणे स्वतंत्र आयुष्य जगायचंय्! मी कुणाचा कधीही गुलाम होणार नाही."

"आपल्या भावना लपविण्याचे सामर्थ्य मला दे" अशी प्रार्थना नोराने केली तरी घरी येताच त्या उफाळून येत आणि मग उशा ओल्या होत.

**आणि अखेर........**

घडू नये असे वाटत होते ते घडले. अशाच एका पार्टीला नोरा इरॉलबरोबर गेली. इरॉल हा काही चांगला नर्तक नव्हता. पण बॅण्डच्या तालावर नोराला बरोबर घेऊन तो नाचला. त्याचे ते नाचणे तिला फारच घसमुसळेपणाचे वाटले. "अशाने माझे कपडे फाटतील की?" ती त्याला म्हणाली.

"असले शेकडो कपडे मी तुला घेऊन देईन—अर्थातच काळ्या रंगाचे" इरॉलला त्या रंगाच्या पोषाखात नोराला पाहणे आवडे. ती त्याला म्हणाली 'पहा हं, मी माझ्या फ्रॉकमध्ये टेपरेकॉर्डर लपवून ठेवला आहे. तो खरी नोंद घेईल."

हास्य विनोद चालू होता. मद्यपानही कमी नव्हते. नोरा 'नाही-नको' म्हणत असताना त्याने तिला खूप मद्य पाजले. मग तिला उभे राहणे कठीण वाटू लागले. त्याने उचलून तिला गाडीत ठेवले. बटण दाबले. एक शय्या तयार झाली. नोरा शुद्धी-वर आली तेव्हा ती दोघे मुलोलॅण्ड फार्मच्या गराजमध्ये होती. नंतर त्याने तिला हात दिला. अर्धवट गुंगीतच ती होती. तिला त्याने प्रथमच मोठ्या शय्यागाराकडे नेले. तिला जाणीव झाली तेव्हा तिने विरोध केला. पण त्याने मानले नाही. ती गुंगीतच होती. मग त्याने तिचे सारे विरोध झुगारून तिचे कपडे उतर-विले. काय घडते आहे हे कळण्याच्या अवस्थेत नोरा नव्हती. आणि जे घडले आहे ते तिला कळले तेव्हा ती फारच अस्वस्थ झाली. संतापली. त्याचा तिने धिःकार केला. "काय घडत आहे ते माझे मलाच कळले नाही" तो वारंवार तिला सांगत होता. "दूर हो—मला स्पर्शही करू नकोस" नोरा म्हणत होती.

"त्याच्या बद्दलच्या माझ्या साऱ्या भावनाच एकदम बदलून गेल्या. आमच्या प्रेमभावनेचा जणु कुणी तरी तीक्ष्ण अशा शस्त्राने खून केला आहे असेच मला वाटून गेले." असे नोरा म्हणते.

—कॉफी घेतली. मूकतेने हे सारे घडत होते. कॉफी घ्यावी. सारे सामान आवरावे आणि ह्या घरातून शक्य तितक्या लवकर कायमचं बाहेर पडावे, असे तिला वाटून गेले.

"नोरा, मी तुझी क्षमा मागतो. त्यामुळे माझ्या हातून घड-लेल्या पापाचे प्रायश्चित्त मिळणार नाही. मी फार प्यालो होतो. नोरा, मला शुद्ध राहिली नाही. पण एकच सांगतो. माझे तुझ्यावर फार प्रेम आहे." इरॉल सांगत होता. "माझे सांत्वन त्याने आता होणार नव्हते" ती म्हणते.

ह्यानंतर ती घरी गेली. आनंदाचा मुखवटा तिने धारण केला होता. पण आतून ती जळफळत होती. मग ती चर्चमध्ये गेली. क्षमा मागितली.

नंतरच्या काही दिवसात ती भटकत राहिली. इरॉलच्या फोन्सला तिने उत्तर दिले नाही. त्याची भेटही तिने टाळली. मैलोन् मैल हेतुशून्यतेने फिरत राहिल्यानंतर तिने मनाशी काही विचार केला. "इरॉल त्या दिवशी इतका प्यायलेला नसता तर? ह्या पूर्वी कधी त्याने मर्यादा सोडलेली नव्हती. १९ व्या वर्षीही एखादी स्त्री पवित्र राहू शकते ह्याची जाणीवही त्याला राहिली नसेल. त्याच्या वयाच्या बाराव्या वर्षीच त्याने घेतलेला तो लैंगिक अनुभव त्याने आपल्याला सांगितला नव्हता का?" ती विचार करीत राहिली. तिने नोकरी सोडल्याचे आई व मार्दाला सांगितले. विचार करू नये म्हटलं म्हणजे विचार येत नाहीत असं थोडंच आहे! विचार येतच राहिले. त्या दुःखद क्षणाची आठवण तिला सतावीतच राहिली.

अखेर इरॉलचे फोन येतच राहिले. एके रात्री तो तिला म्हणाला, "इतके दिवस आपण एकमेकांच्या सहवासात आहोत. आपली मैत्री अशी संपता कामा नये. मला तुझी फार फार गरज आहे. माझे तुझ्यावर प्रेम आहे." अखेर नोराने त्याच्याकडे जायचे ठरवले. पण त्याच्या भोवती फिरले वावरले तरी त्याचा स्पर्श मात्र काही झाले तरी टाळायचाच. हे प्रकरण पुनरावृत्त होऊ द्यायचे नाही असा मनोमन निश्चयही तिने केला.

**आणि आता हेही—**

एक दिवस काम करता करता नोराच्या हातातले नोटबुक खस्कन ओढून घेत इरॉल तिला म्हणाला, "जे घडायचे होते ते घडून गेले. घडू नये असे वाटले तरी ते आता पुसून टाकता येत नाही. पण ती चूक पूर्णपणे सुधारायचा निश्चय मी केला आहे. आपण कायमचे जवळ आलो तर—"

"नाही! कधीही नाही!!" नोरा ताड्कन म्हणाली. "ठीक आहे. तुझे हे नकारात्मक उत्तर मी तात्पुरते स्वीकारतो. घरी गेल्यावर तू न्यायाधीश व ज्यूरीच्या भूमिकेतून शांतपणे विचार कर. स्वतःला न्याय मिळव व मलाही न्याय मिळवून दे."

त्या रात्री नोरा हॉलिवुडच्या निसर्गरम्य परिसरात खूप भटकली. चांदण्या चमचम करीत होत्या. चंद्र किरणांची बरसात सृष्टीवर होत होती. नोराच्या मनातही चांदणे फुलत गेले." "माझे तुझ्यावर प्रेम आहे" ह्या इरॉलच्या वाक्याने किमया केली होती.

दुसऱ्या दिवशी नोराने इरॉलच्या सूचनेला होकार दिला. आणि तरीही इरॉलच्या आयुष्यातल्या दुसऱ्या स्त्रियांचा विचार तिला सतावीतच राहिला. प्रीति आणि मत्सर—स्त्री उत्कट प्रीति देते आणि मागतेही. "इरॉलचे प्रेम फक्त मला आणि मलाच कसे मिळेल? अखेर ह्या साऱ्या स्त्रियांपैकी त्याचे खरे प्रेम कुणावर आहे? प्रश्न सतावीतच राहिले.

त्या दिवशी इरॉल नोराला घेऊन आपल्या शय्यागारात गेला. पण ते शय्यागार सौंदर्याने जणु ओसंडते आहे असा नवा साक्षात्कार नोराला त्यादिवशी झाला. त्या प्रसंगानंतर दोघामधले अंतर झपाट्याने कमी होत गेले. दोघेही जण मेक्सिकोमधील अँकापुल्को या गांवी गेले. तेथे एकत्र एकाच हॉटेलात राहिले. नोराचे नांव त्यावेळी प्रथमच वृत्तपत्रात झळकले. ह्या दोघांच्या लग्नाच्या अफवाही सर्वत्र पसरल्या. ती परत आली तेव्हा वृत्तपत्र प्रतिनिधींनी तिला गराडा घातला. "तिने आपले प्रेम आणि आपले लग्न ह्या दोन्ही गोष्टींचा इन्कार केला. किंबहुना इरॉलने आपल्याला तसे काहीही विचारले नाही असे तिने ठासून सांगितले...

[पूर्वार्ध]








[ नटराजपूजेला वाहिलेल्या 'नंदी' या पाक्षिकाच्या वतीने ज्येष्ठ समीक्षक, अध्यापक, अनुवादक वगैरे वगैरे प्रा. माधव मनोहर वैद्य यांचेवर भरण्यात आलेल्या खटल्याचा निकालाचा दिवस. न्यायमर्ती एक. शून्य. खानोलकर यांच्या कोर्टाबाहेर पेपरविक्यांच्या आरोळ्या ऐकू येतात :

"मराठी रंगभूमीचा खून केल्याचा आरोप !"

"आरोपीचे वजन तुरुंगात ४४ पौंडानी घटले !"

"फाशीची सजा दिल्यास रत्नाकर मतकरी दयेचा अर्ज करणार !"

कोर्टाची खोली तुडुंब भरलेली आहे. प्राध्यापक महाशयांच्या लेखणीने वेळोवेळी जायबंदी झालेले डझनभर नाटककार व दिग्दर्शक आणि शेकडो नटनटचा पब्लिकमध्ये दिसत आहेत.

—ज्ञानेश्वर नाडकर्णी



# नाट्यसमीक्षकावर खुनाचा आरोप !

न्यायमूर्ती खानोलकर प्रवेश करतात तसे शिरस्तेदार सुकुमार नागोटकर गर्जना करतात : "निगा रख्खो ! निगा रख्खो ! कोर्ट येत आहे हो ऽऽऽ !" सुकुमारांच्या तोंडातून बाहेर पडलेल्या हवेच्या लोटाने काळा झगा परिधान केलेले खानोलकर फुंकर मारल्यासारखे दारातून बाहेर फेकले जातात. ते न्यायमूर्तींच्या खोलीच्या खिडकीतून तरंगत तरंगत बाहेर जाणार इतक्यात कोर्ट कारकून संभाजी कदम व छोटू सावंत लगबगीने त्याना धरून आणतात व आपल्या उच्चासनावर बसवितात. न्यायमूर्तींच्या गुप्त आज्ञेने सुकुमारांच्या तोंडावर स्टिकिंग टेप मारण्यात येऊन, त्यांच्याच आज्ञेने कुमुद कामेरकर यांच्याकडे शिरस्तेदाराचे काम देण्यात येते !]

**न्यायमूर्ति** : आज या 'गीत-सौभद्रा'सारख्या लांबत चाललेल्या खटल्याचा शेवटचा दिवस आहे. (कारकुनास, खालच्या आवाजात) फोटोग्राफरची व्यवस्था केलेली आहे ना ? (कारकून पिटात लपून बसलेल्या अरुण राजदत्तकडे न्यायमूर्तींचे लक्ष वेधीत स्वतःच छायाचित्रकारासारखा डोळा मारतो ! ) आरोपी माधव मनोहर, आज तुला बचावाचे भाषण करता येईल; पण एका अटीवर ! ते ४९ मिनिटांपेक्षा जास्त होता कामा नये. झाल्यास कोर्टाचे प्राण धोक्यात आणल्याच्या आरोपावरून तुझ्यावर वेगळा खटला भरण्यात येईल ! शिवाय मला खटला संपवून मालाडची शेवटची लोकल पकडायची आहे ! फिर्यादीचे वकील, तुमचं आणखी काही काम राहिलेलं आहे ?

[ फिर्यादीचे वकील म्हणून अत्रे, अत्रे अ‍ॅन्ड अत्रे सॉलिसिटर्स तर्फे अ‍ॅड. व्यंकटेश पै हे काम पहात आहेत. ]

**अ‍ॅड. पै** : मिलॉर्ड, अजून काही साक्षी व्हायच्या आहेत

**न्यायमूर्ति** : ठीक आहे ! पण माझी मालाडची गाडी.—"रात्र थोडी घागर थोडी" लक्षात ठेवा !

**अ‍ॅड. पै** : प्रथम मी आत्माराम भेंडे याना साक्षीदार म्हणून बोलावतो.

**आरोपीचे वकील** : मिलार्ड, आमची हरकत आहे. साक्षीदार निःपक्षपाती नाही. शिवाय त्याने बसविलेल्या विद्याधर गोखलेलिखित 'साक्षीदार' या नाटकात भारतीय न्यायदानपद्धतीचा अपमान करण्यात आलेला आहे. त्यामुळे. . . .

(आरोपीचे वकील म्हणून पेंजण, बुवा अ‍ॅन्ड सोबत सॉलिसिटर्स तर्फे बॅरिस्टर ग. वा. बेहेरे काम पहात आहेत. तेच आपल्याला क्षणं-








क्षणी फुंकर मारतील अशी भीति न्यायमूर्ती एक. शून्य. खानोलकर यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत आहे !)

**न्यायमूर्ति** : 'साक्षीदार' मध्ये भेंडयांना गाणी किती होती ?

**अॅड. पै.** : सदरहू नाटक प्रोज होते मिलॉर्ड !

**न्यायमूर्ती** : विद्याधर गोखल्यांचे नाटक प्रोज ? छे, म्हणजे ह. रा. महाजनींच्या नाटकाला (फक्त) पडद्याला टाळी मिळण्याइतकी अशक्य गोष्ट आहे. असो. भेंडे साक्ष देण्यास पात्र आहेत !

(सुप्रसिद्ध नट व दिग्दर्शक आत्माराम भेंडे सस्मित वदनाने साक्षीदाराच्या पिंजऱ्यात प्रवेश करतात. पिंजऱ्याच्या कठड्यावर रेलताच तो डगमगतो तेव्हा ते सवयीने चटकन् म्हणून जातात: "हज्जार वेळा या शामला सांगितलं प्रॉपर्टीच्या खर्चात उगाच काटकसर करू नको म्हणून !")

(भेंडयांचा शपथविधी झाल्यावर—)

**अॅड. पै** : भेंडे, आपला व्यवसाय काय ?

(भेंडे वकीलसाहेबांच्या कानात सांगतात. अॅड. पै खालच्या आवाजात न्यायमूर्तींना सांगतात : "भेंडयांच्या चालू नोकरीच्या दृष्टीने त्यांच्या व्यवसायाची वाच्यता होणे इष्ट नाही !")

पण आपण नाटकाचासुद्धा व्यवसाय करता ना ?



**भेंडे** : हो, नोकरी सांभाळून जमेल तसा !

**अॅड. पै** : आरोपी माधव मनोहर यांची आपली ओळख आहे ?

**भेंडे** : हो, फार जुनी ! त्यांची नाटकं मीच वसविली आहेत पूर्वीपासून !

**अॅड. पै** : अगदी अलीकडे त्यांचं तुम्ही वसविलेलं नाटक कोणतं ?

**भेंडे** : (डोके खाजवीत) अगदी अलीकडे ? आठवत नाही बुवा !

**अॅड. पै** : 'झोपलेले नाग' ?

**भेंडे** : छे, ते झोपल्याला खूप वर्षं झाली !

**अॅड. पै** : 'आई' ?

**भेंडे** : छे, मध्यंतरी ते 'रंगायन'नं वसविलं होतं. चीनविरोधी युद्धाचा प्रचार करण्यासाठी !

**अॅड. पै** : मग त्याचं काय झालं ?

**भेंडे** : अहो, चिनी लोकानीसुद्धा आपल्या सीमेवर तेच नाटक सादर करून भारतीय जवानांना वश करण्याचा प्रयत्न केला ! मिलॉर्ड, आमच्या नटांपैकी एक चिन्यांच्या कैदेत होते; त्यांचं तर असं म्हणणं होतं की माधव मनोहरांची नाटकं चीनमध्ये प्रत्येक शहरात रात्रंदिवस ध्वनिक्षेपकावरून ऐकविण्यात येतात ! चिनी लोक माधवरावांना आपल्यातलेच समजतात !

**न्यायमूर्ती** : रात्रंदिवस ? मग झोपमोड होत नाही ?

**भेंडे** : अहो, त्यासाठीच तर ऐकविण्यात येतात. चिनी जनता वाजवीपेक्षा जास्त झोप काढते व राष्ट्रकार्याकडे लक्ष देत नाही म्हणून खुद्द माओने माधोच्या नाटकांचा प्रसार चालवलाय् !

**अॅड. पै** : मिलॉर्ड, आरोपी माधव मनोहरचे दुष्ट राष्ट्रद्रोही चाळे लक्षात घ्यावेत ! आरोपीचे डाव्या कम्युनिस्टांशी घनिष्ट संबंध आहेत.

**न्यायमूर्ती** : (ऑल इंडिया रेडियो — कुडाळ केस आठवून अस्वस्थ होत्साते) ते जाऊ द्या ! आज संपूर्ण महाराष्ट्र समितीत डावेउजवे भाई आहेतच की ! आरोपी माधव मनोहर, माओ आपल्या चाहत्यांपैकी आहे का ?

**माधव मनोहर** : मिलॉर्ड, मुळातच माझे एकही नाटक स्वतःचे नाही ! सारी विलायती आहेत ! तेव्हा चीनमध्ये माझी नाटकं लोकप्रिय असल्यास प्राय: मी त्यावद्दल जवाबदार धरला जाऊ नये !

**बॅरिस्टर बेहेरे** (आरोपीच्या कानात) नॉन्सेन्स ! आपली प्रतिष्ठा अशी 'इन द आयज ऑफ द न्यायमूर्ती' कमी करू नका ! शिवाय कॉपीराइट कायद्यान्वये नवा खटला होऊ शकेल तुमच्यावर !

**अॅड पै** : भेंडे, आरोपींचं 'रामराज्य' नांवाचं नाटक तुम्ही बरीच वर्षं वसविता आहात हे खरं आहे ?

**भेंडे** : हो, ते मीच वसवावं असा आरोपीचा आग्रह आहे !

**अॅड पै** : 'रामराज्य' पिक्चरशी त्याचा काही संबंध ?

**भेंडे** : ते पिक्चर पडेल निघालं म्हणून म्हणता ? छे, ते पौराणिक पिक्चर आहे; आरोपींचं नाटक आधुनिक आहे !

**अॅड पै** : पण त्यातसुद्धा चमत्कार आहेत असं ऐकतो ?

**भेंडे** : हो, हो, ट्रिक सीन्स आहेत !





**ॲड. पै :** म्हणजे आपल्या त्या 'माते, तुला काय हवंय् ?' मध्ये होते तसे ?

[ भेंडे एकदम अंगात आल्यासारखे बोंब ठोकीत, कानावर हात ठेवून, कोर्टाबाहेर धूम ठोकतात. 'लोकसत्ते'चे राजा कारळे लागलीच बाहेर जाऊन टेलिफोनने 'स्टॉप प्रेस' कळवितात. : 'साक्षीदार पिंजऱ्यातून उडाला ! रघुवीर तळाशिलकरांना वहिमावरून त्वरित अटक !" ] मिलॉर्ड, साक्षीदार फरारी झालेला आहे ! आपल्या परवानगीनं आता दुसरा साक्षीदार बोलाविण्याखेरीज गत्यंतर नाही !

(तरुण नाटककार, स्तंभलेखक व समीक्षक विजय तेंडुलकर याना बोलावण्यात येते. त्यांचा शपथविधी झाल्यावर—)

**ॲड. पै :** तेंडुलकर, तुमचा व्यवसाय काय ?

(तेंडुलकर पैसाहेबांकडे डोळे रोखून बघतात, व भेंड्यांसारखेच त्यांच्या कानात काही सांगतात.) मिलॉर्ड, तेंडुलकरांच्या नोकरीची वाच्यता होणंही इष्ट नाही.

**न्यायमूर्ती :** ते मी समजू शकतो. त्यांच्या पावलावर पाऊल टाकून मी एकदा स्तंभलेखनाचा प्रयत्न केला होता. परंतु 'झाला अनंत हनुमंत' अशी माझी स्थिती झाली !

**ॲड पै :** तेंडुलकर, आरोपी माधव मनोहरबद्दल तुमचं काय मत आहे ?

**बॅरिस्टर बेहेरे** (ताडकन् उठून) : प्रश्न गैरलागू आहे, मिलॉर्ड ! आरोपीबद्दल सबंध जगाचं मत वाईट असेल, पण तो काही पुरावा होऊ शकत नाही ! .

**न्यायमूर्ती :** पण सबंध जगाचं चांगलं असलं तर ?

**बॅरिस्टर बेहेरे :** छे ! ते शक्यच नाही ! (जीभ चावून) माझं म्हणणं. . . .

**न्यायमूर्ती :** तेंडुलकर, वाटलं तर तुम्ही या प्रश्नाला डावलू शकता!

**तेंडुलकर :** सध्या माझं मत आरोपीबद्दल चांगलं आहे !

**ॲड. पै :** सध्या म्हणजे ?

**तेंडुलकर :** म्हणजे असं की एक तपापूर्वी आरोपी माधव मनोहरनं माझं 'श्रीमंत' नाटक पिरांदेलोच्या 'प्लेजर्स ऑफ ऑनेस्टी' नाटकावरून चोरलेलं आहे असा आरोप केला !

**ॲड. पै :** आरोप खरा होता ?

**तेंडुलकर :** निखालस खोटा ! अन् तसं मी त्या वेळी म्हटलेलं होतं !

**ॲड. पै :** मग त्यावेळी आरोपी तुम्हाला दुष्ट नरराक्षस वाटला असेल ?

**तेंडुलकर :** हो !

**ॲड. पै :** मग मत केव्हा बदललं ?

**तेंडुलकर :** पुढं त्यानं माझ्या 'मधल्या भिंती'ची खूप स्तुती केली ! अन् आजतागायत आरोपीनं माझ्या प्रत्येक नाटकावर प्राय: चांगलं लिहिलं आहे !

**ॲड. पै :** आरोपीविषयी नाटककार म्हणून तुमचं काय मत आहे ?

**तेंडुलकर :** फारच श्रेष्ठ नाटककार ! आणि समीक्षकही ! असा नाटककार व समीक्षक पुन्हा होणे नाही ! (स्वगत) ॲस्प्रो लिजीये ! (बॅरिस्टर बेहेरे उलटतपासणी घेतात.)

**बॅरिस्टर बेहेरे :** तेंडुलकर, तुम्ही आणि आरोपी माधव मनोहर समदु:खी आहात ना ?

**तेंडुलकर :** कोणत्या अर्थानं ?

**बॅरिस्टर बेहेरे :** माझ्या माहितीप्रमाणं तुम्हा दोघांचीही नाटकं फारशी कधी चाललेली नाहीत !

**तेंडुलकर :** खोटं आहे ! 'माणूस नांवाचे बेट' नाटकाची माझी प्रस्तावना वाचा ! त्यात स्पष्ट म्हटलेलं आहे की केव्हाही माझं नाटक थिएटर भरू शकतं ! हल्ली नाटकाचा धंदा करणारे लोक-सुद्धा माझी नाटकं घेतात !

**बॅरिस्टर बेहेरे :** हे 'माणूस नावाचे बेट' संगीत होतं ना ?

**तेंडुलकर :** छे ! छे ! माझ्या कोणत्याच नाटकात गाणी नाहीत ! गाण्याशिवाय नाटक चालू शकतं हाच तर मुळी आमचा सिद्धान्त आहे !

**न्यायमूर्ती :** (स्वत:ला नकळत) : ॲस्प्रो लिजिये ! ! (गोरेमोरे होत ) पण काय हो, तेंडुलकर ? त्या कोल्हापूरच्या दानव्यानं बेटचानं 'माणूस नांवाचे बेट'मध्ये गाणी घातली होती ना ? असा भ्रष्टाचार तुम्ही त्याला कसा करू दिला ?

**बॅरिस्टर बेहेरे :** मिलॉर्ड, आपण स्वत:च साक्षीदाराला निरुत्तर केलेलं आहे ! साक्षीवरून असं दिसतं की त्याचं एक वड नाही ! शिवाय आरोपीनं अलीकडे त्याच्यावर वाङ्‌मयचौर्याचा आरोप केलेला नाही यातच आरोपीचं सौजन्य दिसून येतं.

**न्यायमूर्ती :** तेंडुलकर, माझ्या 'चि. त्र्यं. बाजीराव' या नाटकाला तुम्ही खूप उचलून धरलं होतं. त्यावरून माझा असा समज झाला होता, की तुम्ही पढविलेली साक्ष चांगली द्याल ! पण आज तो दूर झाला ! अभिनंदन ! तुम्हाला तहहयात कोर्टाचे साक्षीदार म्हणून नोकरी मिळवून देऊ का ?

**तेंडुलकर :** (पिंजऱ्यातून बाहेर पडत, गालातल्या गालात हसत) थॅन्क्स, पण यंदा कर्तव्य नाही ! फोर्टातून कोर्टात स्थानांतर करण्याची घाई नाही ! (जाताना प्रेमाने आरोपी माधव मनोहरचा गालगुच्चा घेऊन जातात.)



मध्यंतरी मुंबईत हा एक शिमगा साजरा झाला !




अनुक्रमणिका

**अॅड. पै :** मिलॉर्ड, आमचे साक्षीदार संपलेले आहेत.

**बॅरिस्टर बेहेरे :** आम्ही तीनच साक्षीदार प्रविष्ट करू इच्छितो.

**न्यायमूर्ती :** ठीक आहे, माझी शेवटची लोकल चुकवू नका.

(आबालवृद्धांचे, नव्या दमाचे नाटककार रत्नाकर मतकरी पिंजऱ्यात राहून शपथ घेतात.)

**बॅरिस्टर बेहेरे :** आपला व्यवसाय काय ?

**मतकरी :** बॅन्क ऑफ सिंदियाच्या भांडवली शाखेत आहे मी !

**बॅरिस्टर बेहेरे :** कसलं काम करता ?

**मतकरी :** नोटा मोजण्याचं ! नाटकधंद्यात तेच सुख मिळत नाही आम्हाला !

**न्यायमूर्ती :** साक्षीदार ! फक्त प्रश्नाचं उत्तर द्या ! नाटकातल्या संवादासारखी सुभाषितवजा वाक्यांची झालर लावत बसू नका ! तुमचा खेळ होतो अन् आमचा वेळ जातो !

**बॅरिस्टर बेहेरे :** आरोपी माधव मनोहरबद्दल तुमचं काय मत आहे ?

**मतकरी :** व्वा ! पप्पा ना ? (जीभ चावून, लाजत) आरोपी लाख माणूस आहे !

**बॅरिस्टर बेहेरे :** किती लाख ? एक लाख? अर्धा लाख ?

**न्यायमूर्ती :** (वैतागून) लखोट्याचं तोंड बंद करायची लाख ! बॅरिस्टर बेहेरे ! आज माझी लोकल चुकली तर तुमची सनद रद्द करण्यात येईल !

**बॅरिस्टर बेहेरे :** (फक्त न्यायमूर्तींना ऐकू येईल अशा आवाजात) अरे, याद राख खानोल्या ! वंड गार्डनच्या प्रवेशातले सारे गुंड गृहस्थ अंगावर सोडीन तुझ्या ! पु. भा. भाव्यांकडून तुझ्यावरच खटला भरीन पिनल कोडाच्या १४४ कलमाखाली ! तुझ्या कवितांची सार्वजनिक होळी करीन खटाववाडीच्या नाक्यावर !

(मोठ्याने) आरोपी माधव मनोहर अन् आपण यांचं काही नातं आहे असं म्हणतात ते खरं आहे का, मतकरी अण्णा ?

**मतकरी :** ते माझे सासरे लागतात !

**अॅड. पै :** मिलॉर्ड, जावई सासऱ्याबद्दल प्रतिकूल बोलणे शक्य नाही ! साक्षीदार मागे घ्यावा !

**न्यायमूर्ती :** कां म्हणून ? सून काय सासूबद्दल चांगली साक्ष देईल ? आरोपी माधव मनोहरला मिशा नसत्या तर त्याला आम्ही साक्षीदाराची सासूच म्हटलं असतं ! आरोपीचे वकील, पुढं विचारा !

**बॅरिस्टर बेहेरे :** आरोपीला मराठी रंगभूमीचा खून करताना आपण प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलेलं आहे का ?

**मतकरी :** कुणी... (जीभ चावून) आरोपी खुनी आहे ? माझ्या प्रत्येक नाटकात एकेक खुनी असतो ! . . .

**न्यायमूर्ती :** लहान मुलांसाठी नाटकं लिहिता ना तुम्ही ? त्यात हे, हे असतं ?

**बॅरिस्टर बेहेरे :** न्यायमूर्तींचा गैरसमज होतोय् ! साक्षीदार प्रौढांसाठी सुद्धा नाटकं लिहितात ! रेडिओवर तर ते फार पूर्वीपासून श्रुतिका लिहिताहेत !

**न्यायमूर्ती :** तरीच एक लक्ष लोकांनी अजून रेडिओचे परवाने काढलेले नाहीत ! काय हो, मतकरी ? रोज रात्री आम्ही आरडाओरडा ऐकतो तो तुमच्याच खुनाचा का ?

**मतकरी :** मिलॉर्ड, शेक्सपियरपासून काकासाहेब खाडिलकरांपर्यंत शेकडो श्रेष्ठ नाटककारांच्या नाटकात असला आरडा-ओरडा आहे....

**न्यायमूर्ती :** प्रायः आहे ! बरं, ठीक आहे ! आरोपीनं मराठी रंगभूमीचा खून केल्यानंतर असा आरडाओरडा झाला काय ?

**मतकरी :** झाला तर ! आरडाओरडा झाला, पण तो "आरोपीनं खून केला नाही !" असा मिलॉर्ड ! त्यासाठी नाट्यसमीक्षकांचा एक संघ स्थापून आरोपीला त्याचं अध्यक्षस्थान देण्यात आलं !

**बॅरिस्टर बेहेरे :** का, काणेकर नव्हते मोकळे ?

**न्यायमूर्ती :** आरोपीचे वकील ! आपल्याच पेशाच्या एका ज्येष्ठाची अशी बेअदबी केल्यास तुमचे वकीलपत्र काढून घेण्यात येईल !

**बॅरिस्टर बेहेरे :** आरोपी माधव मनोहर आपला खटला आपणच चालवायला समर्थ आहे !

**न्यायमूर्ती :** असेल ! पण त्याला ४९ मिनिटांपेक्षा जास्त वेळ मिळणार नाही ! चला, साक्ष आवरा! बारा पन्नासला शेवटची गाडी आहे !

**बॅरिस्टर बेहेरे :** मग मतकरी, जो आरडाओरडा झाला तोच खरा होता का ?

**मतकरी :** तो आरडाओरडा बॅकस्टेजला झाला ! माझा तर असा समज आहे की ललितकलादर्शच्या हीरक-महोत्सवानिमित्त समीक्षकांना दिलेल्या भोजनाच्या वेळी खुद्द भालचंद्र पेंढारकरांनीच तो आरडाओरडा टेपरेकॉर्ड केलेला आहे ! त्यात "खून ! खून !" ऐवजी "भूक! भूक! " सृष्टीची कालथापालथ तर झाली नाही ना ?" हे शब्द ऐकू येतात !

**न्यायमूर्ती :** हां, मग तर तो आरडाओरडा निश्चितच मराठी रंगभूमीसंबंधी होता ! 'हॅम्लेट' नाटकात "भूत ! भूत !" या ओरड्यासाठी हीच टेप वापरतात ना ?

**अॅड. पै :** मिलॉर्ड, आपली लोकल !

**न्यायमूर्ती :** हो, बरी आठवण झाली ! उलटतपासणी आवरा !

**अॅड. पै :** मतकरी, आरोपी माधव मनोहरला स्वतःजवळ काही शस्त्र बाळगताना तुम्ही पाहिलंय् का ?

**मतकरी :** नाही ! आता वस्तऱ्याला तुम्ही शस्त्र म्हणत असाल तऽऽर. . . . ते एक वेगळंच शास्त्र आहे.......

**अॅड. पै :** आरोपीच्या खिशात खुनाच्या दिवशी एक रक्तलांछित वस्तरा सापडला ! एग्झिबिट 'ए' – हा पहा ! (वस्तरा साक्षीदारास दाखवीत) हा वस्तरा आरोपीचाच आहे का ?

**मतकरी :** होय, हे निखालस सत्य आहे ! पण वस्तऱ्यावरचे हे रक्त पप्पांचं.... (जीभ चावून) आरोपीचं आहे, मिलॉर्ड !

**न्यायमूर्ती :** इतकं रक्त ? ब्लडी फूल ! समीक्षक आहे का हजाम ? नीट बघा, लाल शाई असेल !

**मतकरी :** माझी किन्नई एक एकांकिका आहेऽऽ : "लाल गुलाबांची भेट !" त्याच्या प्रयोगात पांढरे गुलाब लाल करण्यासाठी आरोपीनंच

शाई पुरविली होती, मिलॉर्ड !

**ॲड. पै :** न्यायमूर्तींची लोकल चुकली तर तुमचे गाल लाल होतील !

**न्यायमूर्ती :** मराठी रंगभूमीपेक्षा भीषण खून करू तुमचा ! मला टी. ए. मिळत नाही, मतकरी ! शिवाय टॅक्सींचा संप आहे !

**मतकरी :** मिलॉर्ड, बाळ कुडतरकर नाही तर कमलाकार सारंग, झालंच तर दाजी भाटवडेकर, बापूराव नाईक, ज्ञानेश्वर नाडकर्णी आपल्याला कारनं सोडतील घरी ! आपली हरकत नसेल तर रामदास भटकळ. . . .

**न्यायमूर्ती :** ज्ञानेश्वर नाडकर्णींची कार नको ! त्यापेक्षा मराठी रंगभूमीच्या बरोबरीनं खून परवडला !

**बॅरिस्टर बेहेरे :** मिलॉर्ड, माझी कार पुण्याला राहिली आहे, पण बाळ सामंतांची कार मिळविणं जड जाणार नाही !

**ॲड. पै :** आमच्या अत्रे, अत्रे ॲन्ड अत्रे सॉलिसिटर्संच्या बारा कार्स आहेत ! मिलॉर्डनी निश्चिंत असावं !

**न्यायमूर्ती :** फिर्यादीचे वकील, तुम्हाला काहीं विचारायचंय् साक्षी-दाराला ? गुन्हा झालेलाच नाही असा त्याचा समज दिसतो !

**बॅरिस्टर बेहेरे :** मिलॉर्ड, तोच समज बरोबर आहे ! आरोपी माधव मनोहर निर्दोष आहे ! खुनाचं निव्वळ बालंट आहे, मिलॉर्ड !

**न्यायमूर्ती :** ते आम्ही सावकाशीनं ठरवू ! (स्वगत) आता आम्हाला लोकलची घाई नाही ! अत्रे, अत्रे ॲन्ड अत्रे सॉलिसिटर्संची कार आहे ! (उघड) ॲड. पै, तुम्ही आता तुमचं भाषण करा ! पब्लिक अस्वस्थ होऊ लागलेली आहे !

(शिरस्तेदार सुकुमार नागोटकरांना गर्जना करण्याची उसळी येते; तोच संभाजी कदम व छोटू सावंत खुणेने पानतंबाखूचा बार मारण्या-साठी त्यांना बाहिर घेऊन जातात ! कोर्ट उठेपर्यंत शिरस्तेदार थुंकावे कुठे या पेचात तोंड बंद करून स्वतःच खामोष राहातात !)

**ॲड. पै :** मिलॉर्ड आणि ज्यूरीतील सभ्य गृहस्थ हो ! (ज्यूरीतील दीनानाथ पै, बबन प्रभू वगैरे गृहस्थ एकदम दचकतात व "कोण ? मी ?" अशा आविर्भावाने एकमेकांकडे पाहतात !) आरोपीच्या वकिलाने कीतीही आव आणला तरी गुन्हा शाबीत झालेला आहे. केवळ लेखणीसारखे साधे शस्त्र वापरून आरोपी माधव मनोहरने पुण्याहून मुंबईला जाणाऱ्या डेक्कन क्वीनमध्ये ता. ५ नोव्हेंबर रोजी सकाळी मराठी रंगभूमीचा खून केला. त्या आधी तिच्या स्वतःच्या इतिहासाबद्दलच ५१ मिनिटे भाषण करून आरोपीने तिला पूर्ण गुंगी आणली ! आपली तीक्ष्ण लेखणी तिच्या दंडात टोचण्याआधी आरोपीने रविवारच्या केसरीचे जुने अंक व 'सोबत' नावाच्या पेपराचे अंक मयत रंगभूमी हिच्या तोंडावर ठेवून तिला श्वासोच्छवास घेणे मुष्कील करून टाकले ! फार काय, जेव्हा बोरीबंदर स्टेशनवर ती मृतावस्थेत आढळली तेव्हा आरोपीने निर्दयपणे असे उद्गार काढले, की "थेरडी सव्वाशे वर्षांची आहे ! मरणार नाही तर काय ? मागे वॉरटाइममध्ये मेलीच होती जवळ जवळ ! डॉक्टर भालेरावांनी गॅस दिला म्हणून वाचली !"

मिलॉर्ड, आरोपी हा बिलकूल दयामाया नसलेला एक क्रूर, कृतघ्न गुन्हेगार आहे हे उघडच आहे ! ज्या आत्माराम भेंड्यांनी



## ज्ञानेश्वर, छे! अनंता!!

एका सर्कशीला उत्पन्न होत नव्हते. ते तेव्हां मॅनेजरने एक नोटीस काढली आणि त्यात लिहिले कीं यापुढे सवड होईल तसा नोकरांचा पगार देण्यात येईल व त्याना तो नांवाच्या आद्यअक्षरांच्या अनुक्रमाने मिळेल.

दुसऱ्या दिवशी ज्ञानेश्वर नांवाचा नोकर त्यांच्याकडे आला आणि म्हणाला

"साहेब, मी माझे नाव बदलले आहे हे सांगण्यासाठीच आलोय."

"अरे वा! मग तू आता आपले नवीन नांव काय ठेवले आहेस?"

"अनंत!" नोकराने उत्तर दिले.

पदराला खार लावून आरोपीची पडेल नाटके रंगमंचावर आणली त्या भेंड्यांना वोधामृत पाजून पाजून या वैद्याने त्यांचा अक्षरशः दूधभात करून टाकला ! परवाच्या राज्य नाटचस्पर्धेत उत्कृष्ट नाटचप्रयोग होऊनही डावलले गेलेले व्यंकटेश माडगूळकरांचे श्रेष्ठ नाटक जर आरोपीच्या जावयाने लिहिले असते अन् भाच्याने प्रयोगिले असते तरच माधव मनोहरने त्याची बेफाट स्तुती केली असती ! ह्याच्या जावयानेसुद्धा सासुरवाडीचा धसका घेतला आहे, अन् भाचा सदानंद जोशी हा तर "स्वामी ऽऽ ! स्वामी ऽऽ !" असा टाहो फोडीत मुंबईपासून दूर दूर भटकतो आहे. मिलॉर्ड, मराठी रंगभूमी याच्या रक्ताच्या नात्याची नाही म्हणून का हो याने तिच्या रक्ताचा सडा शिंपडला ?

**न्यायमूर्ती :** फिर्यादीचे वकील, शब्द जरा सांभाळून वापरा ! आम्हाला फेंट येते असं काही ऐकलं तर !

**बॅरिस्टर बेहेरे :** मिलॉर्ड, प्रतिपक्षाचे वकील उगाच नाटकी भाषा वापरून आपण मराठी रंगभूमीला सर्वांगांनी ओळखीत होतो असा आपला समज करून देत आहेत.

**न्यायमूर्ती :** (हलक्या स्वरात) ओळख करून घेण्यासारखी होती का हो ती ?

**ॲड. पै :** मिलॉर्ड आणि ज्यूरीतील सभ्य गृहस्थ हो ! आपण नीट एकदा आरोपीकडे पाहा, अन् सांगा तो निष्पाप दिसतो का ! मराठी ड्रामासाठी डायलॉग लिहिणारा हा मुन्शी एक नंबरचा खुनशी दिसतो ! मिलॉर्ड, आरोपीने मराठी रंगभूमीचा खून केला हे त्रिवार सिद्ध झालेले आहे. आपण आरोपीस जास्तीत जास्त कठोर शिक्षा देऊन पब्लिकला उपकृत करावं

**न्यायमूर्ती :** उपकार करण्यात आम्ही कुणालाही हार जाणार नाही! (स्वगत) शिवाय कार तुमची आहे ! (उघड) आरोपीचे वकील ! आता तुमचं वचावाचं भाषण थोडक्यात आपटा—आय मीन आपटा – सॉरी, आटपा !

**बॅरिस्टर बेहेरे :** (प्रथम छाती पुढे काढून आपला काळा झगा फडफडावीत— ड्रॅक्यूलासारखे ! – या पिंजऱ्यापासून त्या पिंजऱ्यापर्यंत नुसते ऐटीत फिरतात.) मिलॉर्ड ! मत्प्रिय मिलॉर्ड आणि ज्यूरीतील सहृदय, सभ्य सद्गृहस्थ हो ! पाहिलेत आपण आरोपी माधव मनोहर वैद्यकडे ? वाटतो का तो आपल्याला खुनी ? किती चिंतनशील चेहरा आहे बरे आरोपीचा ! असा माणूस हॅम्लेटप्रमाणे खुनाचा केवळ विचारच करण्यात आयुष्य वालवील !

(ज्यूरीत : दीनानाथ पै बबन प्रभूंस– "हाँ ह्यामलेट खंयसर रावता?" बबन, वैतागाने– "खोताच्या वाडीत !")

मिलॉर्ड, एकंदा खुद्द आरोपीचाच खून झाला होता हे माहीत आहे आपल्याला ?

(मास्टर विनायकांच्या 'माझं बाळ' मधील पब्लिकप्रमाणे एका झटक्यात माना वळवीत पब्लिक उद्गारते, "आरोपीचा खून ? केव्हा ? कसा? दैनिक सांज धार्मिकचा वार्ताहर "कोर्टात आरोपीचा खून !" असा सनसनाटी व केवळ गिऱ्हाइक खेचणारा मथळा टेलिफोनने कचेरीत कळविण्यासाठी कोर्टाबाहेर पळतो.)

कित्येक वर्षांपूर्वी आरोपी माधव मनोहरने एका इंग्रजी नाटकात ज्यूलियस सीझरची भूमिका केलेली होती !

(पुन्हा "माझं बाळ" इफेक्ट !)

सध्या दिल्ली गाजविणाऱ्या इब-रहिम अल्-काझी नावाच्या नाटचदिग्दर्शकानं विद्यापीठांच्या प्राध्यापकासाठी उत्तरेतल्या सुबाथू नावाच्या हवेशीर गावी एक शिबिर घेतले होते. त्यात माधव मनोहरनेच काय पण वसंत बापट यांनी सुद्धा इंग्रजी नाटकात भूमिका केलेली होती ! आरोपीला त्याच्या व्यक्तिमत्वाला साजेशी सीझरची भूमिका मिळालेली होती ! सीझरच्या शवालगत उभे राहून बापटानी केलेले काव्यवाचन मुकाटयाने रंगमंचावर निश्चल पडून ऐकण्याची शिक्षा आरोपीने त्या काळातच भोगलेली आहे ! आरोपीनं उभ्या आयुष्यात एकच खून पाहिला– तो हा सीझरच्या भूमिकेतील स्वतःचा ! शिक्षा भोगली त्यानेच ! आणखी काही वर्षे जाती तर अल्-काझी ते शिबिरही न घेते अन् आरोपी विद्यापीठीय प्राध्यापक म्हणून त्यात दाखलही न होते !

मिलॉर्ड, आरोपीवरचा आरोप हा 'नंदी' पाक्षिकाने केवळ आरोपीने 'नंदी'च्या संपादकाना बैल म्हटल्यामुळे सूडवुद्धीने केलेला आहे. मिलॉर्ड, आरोपी बैलाच्या पाठीला हात लावून त्याला गाय समजून नमस्कार करण्याइतका खुळा नाही ! त्याने 'नंदी'वर काहीही अन्याय केलेला नाही !

मराठी रंगभूमीच्या खुनाची एवढी हाकाटी चालली आहे पण प्रेताचा पत्ता नाही ! प्रेत मराठी रंगभूमीला पचत नाही असं. वसंत मानेलिखित 'चौऱ्याऐंशीचा फेरा', नाना जोगकृत 'तीनअंकी हॅम्लेट' आणि रणजित देसाईकृत 'तानसेन' या नाटकांच्या प्रयोगांचा कौल

आहे ! एवढंच, मराठी रंगभूमी स्वत: प्रेतवत् झालेली नाही; ती आता जास्त. . .

**न्यायमूर्ती :** (जांभया देत, चुटक्या वाजवीत) पुरे ! पुरे ! आरोपीचे वकील, तुम्ही आमचा खून पाडू नका ! आता खुद्द आरोपीला काही वक्तव्य करावयाचे असल्यास त्याने ते करावे. पण थोडक्यात! आपले समीक्षण तारेने पाठवावयाचे आहे असे समजून !

(माधव मनोहर वैद्य यांना पिंजऱ्यात आणण्यात येते. आरोपीच्या तोंडातील चिरूटाचा वास सहन न होऊन ज्यूरीतील एक खरोखरीची सभ्य स्त्री नाकावर रुमाल ठेवते.)

**माधव मनोहर** : मिलॉर्ड ! मिलॉर्ड ! मिलॉर्ड !

सा रे ग नि रे प म ग सा नि ध रे

म रे म रे ग रे ग रे सा ऽ ऽ रे

(सबंध कोर्ट अचानक मोहिनी घातल्यासारखे झोपी जाते !)

(पुरी ४९ मिनिटे झाल्यावर, सूर्य उगवून चोहीकडे प्रकाश फाकावा तशी कोर्टाला जाग येते !)

**न्यायमूर्ती :** कोर्टाला जेव्हा जाग येते – कोर्टाला जेव्हा जाग येते, तेव्हा निकाल लागलीच दिला जातो ! ज्यूरी अजून झोपेत आहे ! खुद्द आरोपीही झोप अनावर होऊन डुलक्या देताना दिसतो आहे ! बाकी चिरूट ओढीत ओढीत निश्चिंतपणे डुलक्या देणारा हा पहिलाच आरोपी पाहिला आम्ही ! असो.

आरोपी माधव मनोहर ! (आरोपी घुर्रर्र करतो.) तुझा गुन्हा आमच्या दृष्टीने शाबित झालेला आहे; परंतु तू धंदेवाईक गुन्हेगार नाहीस हे आम्ही जाणीत असल्यामुळे तुला काही माफक शिक्षा फर्मावीत आहोत :

(१) दर रविवारी आरोपीस बाबूराव गोखले यांच्या कंपनीचे चारही खेळ ओळीने बघावे लागतील.

(२) आरोपीस सहा महिने अत्रे थिएटर्सच्या 'सोन्याची खाण' या नाटकाचे प्रसिद्धी प्रमुख म्हणून बिनपगारी काम पाहावे लागेल.

(३) आरोपीस यापुढे चिरूट ओढण्यास मिळणार नाही.

(४) उर्वरित आयुष्यात आरोपीस सक्तीने टेरिलिनचा सूट व बूट (बूट कातड्याचे) परिधान करावे लागतील.

(५) 'जय जय गौरीशंकर' या नाटकात आरोपीस सहा महिने सक्तीने वाघाची भूमिका करावी लागेल. त्याचप्रमाणे राम मराठे गैरहजर असतील तेव्हा बिनतक्रार दाढीमिशा लावून, आपले एरवीचे वाघाचे कातडे पांघरून, शंकराची भूमिका करावी लागेल.

(६) समीक्षक संघाचे अध्यक्षस्थान तांबडतोब सोडून आरोपीस एक वर्ष लातूर, नांदेड, परभणी अशा ठिकाणी अध्यापन करीत राहावे लागेल.

(७) आपल्या जावयास अगर भाच्यास एक वर्षभर तरी भेटण्याची आरोपीस परवानगी नाही. भेटल्यास तुरुंगात पोलिसांच्या साक्षीनेच बातचीत होऊ शकेल.

(८) मधुसूदन कालेलकर, बाळ कोल्हटकर व हिराकांत कलगुटकर यांच्या प्रत्येक नाटकाचे (नाटक न चालल्यास) पहिले दहा ते पंचवीस प्रयोग आरोपीस सक्तीने बघावे लागतील.

(९) आरोपीस दर वर्षी राज्य नाट्य स्पर्धेचे लातूर येथे परीक्षक नेमण्यात येईल. दर नाटकामागे आरोपीकडून दहा रुपये दंड घेण्यात येईल.

(१) आरोपीच्या शिलकेतील एकूण एक अनुवादित नाटके रमेश देव, पद्मा चव्हाण व शरद तळवलकर यांच्या नटसंचात बसविण्यात येतील. त्यांच्या खेडोपाडी होणाऱ्या प्रयोगांना आरोपीस तिकिटाच्या खिडकीवर काम करावे लागेल.

तूर्त एवढी शिक्षा पुरे. (स्वगत) आरोपीच्या वकिलाची कार जास्त चांगली असती तर निकाल जरा जास्त मर्यादशील दिला असता !

(न्यायमूर्ती एक. शून्य. खानोलकर धिमेपणाने पावले टाकीत कोर्टाबाहेर जातात. आरोपी माधव मनोहर यास पोलिस लॉकअपमध्ये नेत असताना कोर्टाच्या इमारतीच्या पायरीपायरीवर उभ्या राहिलेल्या २५ सुवासिनी— इंडियन नॅशनल थिएटरच्या गरबा-रास विभागाच्या सौजन्याने — आरोपीस ओवाळतात. 'नंदी'चे संपादक अखेरीस कोर्टाची दारे लावून घेतात !) •••















# ललित कलादर्शचा नेत्रदीपक हीरकमहोत्सव

**"ललित** कलादर्श" च्या नाट्योत्सवाचे एक वैशिष्ट्य म्हणून एक गोष्ट नमूद करावीशी वाटते. ती गोष्ट मला उत्सवात झालेल्या प्रयोगांच्या प्रायोगिक यशापयशापेक्षा महत्वाची वाटते. एखाद्या कंपनीच्या वाढदिवसानिमित्त होणाऱ्या प्रयोगात दुसऱ्या एखाद्या कंपनीने आपल्या कंपनीचा **"मुहूर्ताचा"** प्रयोग सादर करण्यात **"सन्मान"** मानावा ही गोष्ट मराठी रंगभूमीच्या इतिहासात "अभिनव" व मराठी रंगभूमीच्या दृष्टीने अत्यंत आशादायक गोष्ट आहे असे मला वाटते. एक नवे वळण घेणारी व रंगभूमीचे वैभव वाढविणारी अशी ही घटना आहे असे मला वाटते. ह्या बाबत मी **भालचंद्र पेंढारकर, प्रभाकर पणशीकर** (कटयार काळजात घुसली) **शाहीर साबळे आणि पार्टीचे साबळे** (असुनि खास मालक घरचा) **बाबूराव गोखले** (स्वयंसिद्धा) या साऱ्यांचेच मनःपूर्वक अभिनंदन करतो. मराठी नाट्यव्यवसाय व मराठीतील हौशी वा नवेनवे प्रयोग करणारी मंडळी ह्यांच्या आजच्या ह्या "आचार संहिते"तून मराठी रंगभूमीवर एक "नवे युग" सुरू होत आहे. इतपत ही घटना मला महत्वपूर्ण वाटते. आपल्याकडे कलेच्या क्षेत्रात 'घराणी'च फार ! [illegible] घराण्यांचे कडवे 'अभिनिवेश'ही फार ! त्यांचे बरेवाईट परिणाम आपण पूर्वीही अनुभवले आहेत. आजही अनुभवतो आहोत. ह्या दृष्टीने ह्या सर्व मंडळींनी घेतलेली व्यापक बैठक मला स्वागतार्ह वाटते.

'घराण्या'चा अभिमान – आत्यंतिक अभिमान हाच विषय घेऊन संगीताच्या क्षेत्रातील एक 'सनातन' समस्या **पुरुषोत्तम दारव्हेकर** यांनी आपल्या **"कटयार काळजात घुसली"** ह्या संगीतप्रधान नाटकात मांडली आहे. दारव्हेकरांच्या 'नयन तुझे'-मध्ये माफक संगीत होते. समाधान न करणारे. वाटे गोपाळ कौशिकांनी आणखी गावे. पण 'संगीताला' न्याय नव्हता. ह्या नाटकाला मी 'संगीतप्रधान' म्हणून संबोधण्याचा हेतु हा की ह्या नाटकात संगीताला योग्य तो न्याय मिळाला आहे. संगीताची बैठकच ह्या नाटकाने स्वीकारली आहे. संगीतातली घराणी व घराण्यांच्या निष्ठा हा विषय तसा नवीन नाही. पण त्यातून येणारा संघर्ष टिपून घेऊन, तो आपल्या काव्यात्म व नाट्यात्म भाषेत काही क्लृप्त्या वापरून दारव्हेकर यांनी "कटयार काळजात घुसली" ह्या नाटकात मांडली आहे. ह्या नाटकाची बैठक अपरिहार्यपणे संगीतप्रधान झाली आहे. परंतु संगीताचा अतिरेक मात्र ह्या नाटकात जाणवत नाही हे प्रथमच नमूद करतो.

नाटकाचे कथानक सांगत बसत नाही. कारण ते साऱ्यांना ठाऊक झालेले आहे. टीकेच्या संदर्भात ते थोडेफार स्पष्ट होत जाईलच म्हणून सांगत नाही. ज्या दोन घराण्यांच्या कला कल्पनाविषयक संघर्षातून हे नाटक घडते त्यातले एक आहे पंडित भानुशंकरजींचे आणि दुसरे आहे खाँसाहेब अफ्ताबहुसेन यांचे. ह्या नाटकात पंडित भानुशंकरजींना संगीतदृष्ट्या फारसे काम नाही. फ्लॅशबॅक पद्धतीने त्यांचा आणि प्रसाद सावकार जी भूमिका करतात त्या सदाशिवाचा प्रथम संबंध सूचित होतो त्या प्रसंगापुरताच त्यांच्या गायकीचा नाटकात उपयोग केला आहे. त्यांच्या गायकीचे अस्तित्व मात्र नाटकभर त्यांच्या मुलीच्या व शिष्याच्या रूपाने जाणवत राहते. त्याचा वापर कौशल्याने केलेला आढळतो. कलानिष्ठा आणि ती मिळविण्याच्या मार्गातील मानव-निर्मित अडथळे–घराण्यांच्या कल्पनांच्या भिंती व त्यापायी कलावंताची होणारी परवड प्रभावीपणे प्रेक्षकांपुढे मांडण्यात आली आहे. अफ्ताबहुसेनच्या मनाचा संघर्ष नाटककाराने वास्तव पद्धतीने चितारला आहे. त्यातली आत्यंतिकता, आणि परिस्थितीवर मात करूनही ती टिकविण्यासाठी त्याची चाललेली धडपड अभिव्यक्त करण्यात श्री. वसंतराव देशपांडे यशस्वी झाले आहेत. खाँसाहेबांचे वय, त्यांचा अभिमान, त्यांची तडफड आणि आपल्या 'राजगायकी'च्या मागची कथा आणि व्यथा व्यक्त करीत असताना होणारी मनाची कोंडी–उलघाल ते फारच चांगल्या पद्धतीने व्यक्त करतात. ह्या नाटकात त्यांचे गाणे रंगते. संयमी संगीताचा सुयोग्य वापर ह्या नाटकात आहे, त्यामुळे दोन श्रेष्ठ गायक लाभूनही ह्या नाटकातल्या संगीताला कोठेही कंटाळवाणेपणा वा 'दळण' लाभलेले नाही. 'मैफलीचे मानकरी' एकत्र आणूनही संगीत नाटकाची 'मैफल' भरवून 'नाट्य' मारण्याचा प्रकार प्रस्तुत नाटकात घडत नाही. नाही म्हणायला काहीच्या मते रागरागिण्यांची जी (कवि) कल्पना रागांच्या रंजकतेसाठी घातली आहे ती काहीना अप्रस्तुत वाटली. मला मात्र तसे वाटत नाही. तो भाग काहीसा अप्रस्तुत वाटला तरी 'कविराजा'ची व्यक्तिरेखा, त्याचे सामर्थ्य, त्याची नाटकातली प्रस्तुतता व त्याची व्यथा सिद्ध करण्यासाठी त्याचा चांगला उपयोग होतो. यात प्रसाद सावकार, वसंतराव देशपांडे, भार्गवराम आचरेकर, फैयाज, शुभांगी, शेखर सावकार, बालकराम ही 'गायक' मंडळी एकत्र आली असूनही साऱ्यांनी ह्या नाटकातल्या संगीताचा "डौल" राखला आहे. नाटक खाऊन टाकलेले नाही. शेखर सावकार ह्याच्या रूपाने प्रसाद सावकारांनी मराठी रंगभूमीला एक 'प्रसाद-चिन्हच' दिले आहे असे म्हटले तर वावगे ठरू नये. त्याचे छोटेसे कामही मनात घर करून गेले आहे.








ह्या नाटकातले श्याम आडारकर यांचे नेपथ्य हा एक 'सुंदर' 'नेत्रसुखद' प्रयोग! फिरत्या रंगमंचाचा कलापूर्ण उपयोग जाणवतो. अंधार-उजेडाचा एकसारखा होणारा खेळ प्रेक्षकांना 'वैताग' आणतो, पण ह्या नाटकात ज्या पद्धतीने त्याचा उपयोग झाला आहे ती पद्धत आल्हादक वाटली. त्यातला 'चमत्कार'ही समाधान देऊन गेला. दारव्हेकर–पणशीकर–अभिषेकींचे अभिनंदन !

एक विनंति–वेळेसाठी उगीचच 'नको तिथे' व 'नको तितकी' कात्री लावण्याच्या भानगडीत पडू नका. काही सुंदर स्थळे उगीचच कातरली जातील.

ललितकलेच्या उत्सवातल्या दुसऱ्या दोन प्रयोगांपैकी 'असुनि खास' बद्दल मी फारसे लिहू इच्छित नाही. कारण लिहिण्यासारखे 'खास' असे काही त्यात नाही असे माझे स्पष्ट मत आहे. एका 'चालू' विषयावरचे एक 'सुमार' रुपक एवढेच त्याबद्दल फार तर म्हणता येईल. त्या नाट्यातला (लोक) आल्हादक भाग म्हणजे जयमाला काळे व केसकर ह्या दोन नर्तिकांनी खास 'मऱ्हाठी' लावणीपासून पाश्चात्य पद्धतीच्या 'रोंबासोंबा'-पर्यंत केलेला नृत्य–विलास! दोघी मनसोक्त (अर्थातच दिग्दर्शकाच्या इच्छेनुसार) नाचल्या. 'प्ले-बॅक' गोड होता. राजा मयेकर ह्यांचा 'अण्णा' व 'शेटजी' दोघेही मनपसंत ! शाहीर साबळे मात्र स्वत: अगदीच फिके ( व कमी) पडले. ते बाचकत–बिचकत वावरत आहेत असे जाणवत होते. त्यांच्या गाण्यातही 'मजा' नव्हती. त्यामानाने त्यांचा मागला वग अधिक चांगला (प्रचारकी असूनही) होता असे म्हणता येईल.

**'स्वयंसिद्धा'** हे श्री. शि. मो. घैसास ह्यांचे नवे नाटक ! बाबूराव गोखले ह्यांच्या श्रीस्टार्सने उत्सवात सादर केले. प्रागजी डोसा ह्या गुजरथी लेखकाच्या नाटकावरून केलेले हे स्वैर रूपांतर ! रूपांतर करताना योजिलेली परिभाषा ही उपमा–दृष्टांतानी इतकी कृत्रिम, बोजड करून टाकलेली आहे की, त्याखाली नाटकाची 'स्वाभाविक' प्रकृति मरूनच जावी. ह्या नाटकाची कथावस्तु अनेक असंभाव्य, अवास्तव व कृत्रिम गोष्टींनी अशीच लघलेली आहे. ह्या नाटकाची नायिका चंडी ही रस्त्यात एका बैलाशी झुंज घेते. हे दृश्य पाहून जमीनदार राजा खूष होतो व तिचे लग्न छोटेबाबूंशी ठरवतो. घरातून विरोध, कुलशीलाचा प्रश्न निघतो. मग तिचे लग्न बडेबाबूंशी लावण्यात येते. बडे बाबू ठार वेडे. त्यांना चंडी 'झटपट विद्यालयात' लग्नाचे पहिले दिवशी (खरं तर रात्रीच)च दाखल करून घेते आणि वर्षभरात त्याला 'शहाणे' करून सोडते. तो जणु बृहस्पतीचा अवतारच बनतो. बडे बाबूंना छोटे बाबूंनी पूर्वी कधीतरी मारलेले असते. मग चंडी त्याची परत फेड करते. मग कलेक्टर कमिशनरांना चंडीचे तुफान (कडक) 'बौद्धिक' देण्यात येते. बडे बाबू 'बौद्धिक' चमत्कारांनी साऱ्यांना थक्क करतात. मग सारे जण 'शरण' येतात. चंडीचा जयजयकार होतो.

ह्या नाटकाला एकूण स्वरुप फार्सचेच लाभलेले होते. आरडाओरडा, हाणामार, शाब्दिक फैरी फार. सारे कसे स्थूल बटबटित, शॉक्स देत जाणारे. 'डेलिकसी' नाहीच. सारेच मुळी 'फार्सिकल' न पटणारे







अनुक्रमणिका

—नाटकातली स्वयंसिद्धा (चंडी) लता काळे (ग्राने देवयानी—तीच तशीच) आणि राजा झालेले बाबूराव गोखले ही नांवे घेण्यासारखी वडी नावे. (पण वडी न ठरलेली), बाबूराव गोखल्यांचे ठीक आहे. पण लता काळे यांनी मात्र स्वतःला 'ब्रँड' करून घेऊ नये असे वाटते. (आपल्याकडे ब्रँड करणारे दिग्दर्शक—निर्माते फार. ब्रँड होण्याने होणारे तोटे लतावाईंना सांगायला हवेत असे नाही.) त्यांच्या ठिकाणी चांगले कलागुण आहेत. त्यांना अजूनही काही नवी 'क्षितिजे' दिसू शकतील. दिसोत अशी इच्छा.

ह्या महोत्सवातील वैशिष्टयपूर्ण नाटक म्हणून मला तरी '**कटचार काळजात घुसली**' ह्या नाटकाचा उल्लेख करावासा वाटतो.

## सरकारी नाट्यस्पर्धा (वार्षिक जमाखर्च)

प्रतिवर्षीप्रमाणे यंदाही महाराष्ट्र शासनाच्या करमणूक विभागाच्या विद्यमाने राज्य नाटयस्पर्धा आयोजित करण्यात आली होती. राज्य नाटयस्पर्धात भाग घेणाऱ्या संस्थांची संख्या, येणारी नवी नाटके, जुन्या नाटकांचे (नवे व नवखे) प्रयोग, त्यातून भाग घेणारे हौशी व आता हौशी राहिलेले नसूनही केवळ 'हौशी' मंडळीत बसण्यात आनंद मानणारे कलाकार, नेपथ्याबाबत होणारे नवे नवे प्रयोग, नवे लेखक, नवी नाटके, नव्या कल्पना, नवे आविष्कार आणि त्यानिमित्ताने पुढे येणारे नवे दिग्दर्शक ह्या साऱ्या गोष्टी पाहिल्या की असे वाटते की ह्या स्पर्धा आता चांगल्याच स्थिरावल्या आहेत, ह्या स्पर्धांचा एक सर्वात मोठा फायदा असा की, त्यांनिमित्ताने अवघ्या महाराष्ट्रात (व बृहन्महाराष्ट्रातही) एक नाटयविषयक प्रचंड उत्साह निर्माण होतो. वातावरण निर्माण होते. नवी आव्हाने मिळतात. त्यांतून नवी जिद्द निर्माण होऊ शकते. आज ह्या स्पर्धांचा प्रपंच इंदूरपासून लातूर, औरंगाबादपर्यंत आणि नागपूर भोपाळपासून बेळगाव—नगरपर्यंत पसरला आहे. हा प्रयोग कोठलीही हौशी वा धंदेवाईक कंपनी करू शकली नसती, तो त्यांना पेललाही नसता. परंतु महाराष्ट्र राज्य शासनाने हा उपक्रम सुरू करून त्यातल्या यशापयशाने वा आर्थिक लाभ—तोटयाचा विचार करून खचून न जाता तो चालू ठेवून एक मोठे 'कला—कार्य' साधले आहे. जगात परिपूर्ण असे काहीही नसते. असतात ते सारे प्रयोगच! अपूर्णतेकडून पूर्णत्वाकडे जाण्यासाठी केलेले. सरकारी स्पर्धांचा ज्यावेळी मी विचार करतो तेव्हा असे वाटते की, ह्या स्पर्धांचे सारे गुणावगुण ध्यानी घेऊनही ह्या उपक्रमाला साऱ्या नाटय—रसिकांनी व संस्थांनी साथ द्यायला हवी. त्यातले दोष घालविण्यासाठी टीका जरूर हवी. परंतु त्या उपक्रमामागच्या सद्‌भावनेचा उपमर्द न होईल इतपत व अशीच हवी. मी ह्या स्पर्धांचा जेव्हा विचार करतो तेव्हा सर्वप्रथम मला जी गोष्ट जमेची म्हणून नमूद करावीशी वाटते ती अशी की, ह्या स्पर्धेतून अनेक नवें, गुणी नाटककार मराठी रंगभूमीला (होय, रंगभूमीलाच) मिळाले आहेत. ज्यांना आपण 'आजचे' 'गुणी' नाटककार म्हणून म्हणतो ते नाटककार ह्या स्पर्धांतून मिळाले आहेत. त्यांची नांवेच हवी असल्यास घ्या— पुरुषोत्तम दारव्हेकर, वसंत कानेटकर, गो. नी. दांडेकर, विजय तेंडुलकर, शं. गो. साठे, व्यंकटेश माडगुळकर, गो. गं. पारखी, ही संख्या प्रतिवर्षी वाढते आहे. उद्याचे नाटककार ह्या भट्टीत घातले गेले आहेत. त्यांची काही 'दाद 'गेल्या दोन तीन वर्षात नाटयरसिकांनी दिली आहे. आजच्या ह्या प्रयोगातून उद्याची रंगभूमी तिचे नवे नाटककार मिळविणार आहे हे निर्विवाद यश नव्हे काय? ह्या नव्या नाटककारात काही 'यशस्वी' पदचिन्हे दिसतात. श्याम फडके, बाबा डिके, सुरेश खरे, रणजित देसाई, श्रीनिवास कोचकर, श्री. ना. पेंडसे, प्रा. तोडरमल, रत्नाकर मतकरी ह्या नव्या-जुन्या नाटककारातून उद्याची रंगभूमी उभी राहणार आहे. यंदाच्या स्पर्धांत तशी काही प्रचीति मिळाली. काही लेखन विषयक नवे प्रयोग पहायला मिळाले. यंदाच्या नव्या नाटकांपैकी सैनिक नावाचा माणूस (तोडरमल) निखारे (रत्नाकर मतकरी) संभूसांच्या चाळीत (श्री. ना. पेंडसे) काका किशाचा, ही चौकट वाटोळी (श्याम फडके) खेळ दो जिवांचा (रत्नाकर मतकरी) सती (व्यंकटेश माडगुळकर) ह्या नाटकातून काही 'नवे' गवसले. विशेषतः सैनिक नावाचा माणूस, निखारे, संभूसांच्या चाळीत, काका व सती ह्या नाटकांबाबत असे खात्रीने म्हणता येईल की लेखक फार मोठी आशा निर्माण करून गेले आहेत. हा विचार लेखन विषयापुरताच मर्यादित आहे. "काही तरी नवेच करा." असा संदेशच जणु ह्या मंडळींनी गिरवला असावा.

ह्या निमित्ताने एक विचार मांडावासा वाटतो तो असा की ह्या स्पर्धांतून सहसा जुनी, नाटयगुणांचा कस लावणारी नाटके होताना फारशी दिसत नाहीत. अत्रे, रांगणेकर, तेंडुलकर यांची जुनी नाटके अधुन मधुन होतात. पण गडकरी, देवल, खाडिलकर, कोल्हटकरांची नाटके कुणी 'आव्हान' म्हणूनही करताना दिसत नाहीत. कदाचित 'स्पर्धा' ह्या नावामुळेच ही आव्हाने स्वीकारली जात नसावीत (मागे आय्. एन्. टी. ने 'पुण्यप्रभाव' सादर केले होते. छेः नको ती आठवण) परंतु गोवा हिंदु असो. ने शारदा, खडाष्टकचे चांगले प्रयोग सादर केले होते हे स्मरते. काही जिद्दी कलाकारांनी ही आव्हाने स्वीकारायला हवीत.

यंदाच्या अंतिम स्पर्धात एकूण १८ नाटके सादर करण्यात आली. त्यातली १० सर्वस्वी नवीन अशी होती. दारव्हेकर, तेंडुलकर, पेंडसे ही मोठी नावे. कोचकर, डिके, सातव, श्याम फडके ही त्या मानाने नवी. रणजित देसाई, माडगुळकर, धाकटी पाती ही जुनी—नवी नांवे. यंदाच्या नाटकात 'सती' हे चांगले नाटक माडगुळकरांनी दिले. एक 'तरल' असा विषय त्यांनी संयमाने, पण समर्थपणे हाताळला. प्रयोगही चांगला झाला. वारसा हे नाटक त्यामानाने निराशा करून गेले. नाटकात संदेश, उपदेश, शिळोप्याच्या गप्पा आणि आंघोळी फार. टाळयांची


अनुक्रमणिका

वाक्ये होती (पण एकूण प्रकार शिळोप्या-चाच वाटल्याने प्रेक्षकांची 'दाद' मिळाली नाही) शेवटचा आगीचा सीन फार प्रभावी ठरला. नाटक मात्र सुमार. काळजाला भिडलेच नाही. 'संभूसांच्या चाळीत'ला पहिले बक्षीस मिळाले, (लेखनाचे व प्रयोगाचेही) चाळ 'सजीव' वाटली, प्रयोग परिपूर्ण वाटला. पण नाटकात 'मसाला' जास्त वाटला. 'संभूसांच्याच चाळीत'ला तो संघर्ष नव्हता. तो माने ब्लॉक्स किंवा एखाद्या 'निकेतन'मधलाही असू शकतो. तो 'मूलभूत'च ! चाळीचे वातावरण फक्त 'वैताग' (पेंडशांचाच शब्द) कमी करण्यासाठी आलेले. त्यामानाने 'निखारे' ह्या मतकरी यांच्या नाटकाने प्रयोग व लेखनदृष्ट्या फार मोठी झेप घेतली आहे असे म्हणावेसे वाटते. त्या नाटकाला 'न्याय' झाला नाही ही गोष्ट मुद्दाम नमूद करतो. ह्या नाटकाचे लेखन आणि प्रयोग ही दोन्हीही 'आव्हाने'च होती. ती मत-करी–रमेश चौधरींनी स्वीकारली. यशस्वी करून दाखविली. परिपूर्णतः!! पण परिक्षक? खैर, जाने दो!! मुद्दा वेगळाच. नंतर लिहीन. सैनिक नांवाचा माणूस ह्या नाटकाचे लेखन; प्रयोग असाच दृष्ट लागण्यासारखा झाला. निखारेप्रमाणेच तेही एक (नवे) आव्हान होते. पुण्या-मुंबई पलिकडच्या ह्या नव्या नव्या प्रयो-गांवर लोक खूष होते. एक 'नवे जग' ह्या निमित्ताने तोडरमल यांनी मराठी प्रेक्ष-कांना दाखविले. ते नाटक हा एक नवा 'मैलाचा दगड' ठरावे. प्रा. तोडरमल यांचे अभिनंदन!!

स्पर्धांच्या निकालासंबंधी काही लिहिणे भाग आहे (भाग आहेच म्हणतो). तसा कुठलाच निर्णय सर्वस्वी वादातीत कधी नसतो हे मान्य करूनही यंदाचा निकाल हा 'न्याय्य' म्हणता येत नाही. काही ''नाट्यबाह्य' विचार ह्या निकालावर दडपण टाकीत आहेत काय ? अन्यथा निखारे, सैनिक नावाचा माणूस, सती ह्यांना टाळून 'संभूसांच्या चाळीत व काका किशाचा'ला बक्षीसे दिली गेली नसती. 'निखारे'बद्दल निःसंशयच अन्याय झाला आहे. 'रवीन्द्र' ला ''शांतता! कोर्ट'' बाबत ही अशीच 'बोंब' आहे. ते नाटकही मी पाहिले आहे. त्याच्या तुलनेने 'रवीन्द्र' केंद्रातून आलेली नाटके सामान्य वाटली हे मुद्दाम नमूद करतो. परिक्षक पाच त्यातले एक दोन दिवस गैरहजर आणि नाटके १८. निर्णयाची नेमकी कसोटी कोणती? पण यंदा 'न्याय' दिसला नाही एवढे मात्र खरे. निवड करताना काही कसोटचा ठरवल्या गेल्या पाहिजेत. तोल राखला गेला पाहिजे. 'प्रादेशिक विचार' बंधनकारक मानला जाऊ नये. मुंबई-बाहेरच्या नाटकांबाबत मुंबईकर प्रेक्षकांनी अधिक समंजसपणा व सहानुभूति दाखवावी. पारितोषिकांची संख्या वाढविली जावी (सर्वच दात्रतीतली) चांगल्या नाटकांचे प्रयोग शासनाने आपण होऊन स्वीकारावेत व स्पर्धांच्या केंद्रातून मराठी प्रेक्षकांना दाखवावेत. एखाद्या वर्षी 'जनता

[पृष्ठ ५८ वर पहा]






दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तके पाठविताना नेहमी २ प्रति पाठवाव्यात. म्हणजे निश्चित अभिप्राय देणे सोईचे होते. १ प्रत असल्यास नुसती पोच दिली जाते.

—संपादक

**शापित गंधर्व ★ चिद्घोष**

## गंधर्वांच्या कथा पण गंधर्व शापित

'शापित गंधर्व' हा श्री. गोपाळकृष्ण भोवे यांचा पहिला कथासंग्रह. तसे पाहता पहिल्यावरून (आणि पाहिल्यावरून) रसिकानी वरून घ्यावा असा भोवे हा नग नव्हे. परन्तु प्रस्तावनाकार श्री. दलाल यांनी म्हटल्याप्रमाणे 'भोवे ठळकपणे नजरेसमोर आले ते त्यांनी उत्तम भाषाशैलीने नटलेल्या, संगीतकार, साहित्यिक, चित्रकार, वगैरेंच्या व्यक्तिचित्रांमुळेच. या भोवे यांच्या व्यक्तिचित्रांचा विशेष असा की, स्वतःकडे गौण भूमिका घेऊन त्या त्या व्यक्तींचे पुरुषार्थपूत, आशयानुकूल व ध्येयनिष्ठ जीवन होता होईल तो शब्दजंजाल टाळून किंवा गाळूण आकारले व समूर्तले. संगीतकारावर लिहिताना कान शाबूत व स्वागतशील ठेवल्याने गान, वाद्य आणि लय यांचा संदर्भ सुसंगत राहिला आणि अक्षरशः 'नाद' घुमला! तीच खुबी इतर व्यक्तिचित्रांच्या (क्वचित अतिशयोक्त विशेषणांची खैरात सोडून) बाबतीत अश्राप आणि अखंड राहिली. यामुळे ध्वनीचा, अन्वयाचा आणि प्रतिमांचा मागोवा व वेध घेण्याचे वळण त्यांच्या निवेदनाला लागून एक अतुल अशी अर्थपूर्णता व रसपूर्णता त्यांच्या शैलीला लाभली. असे असले तरी भोवे चांगल्या कथा लिहितील आणि कथा लेखकांच्या रांगेतले लक्षणीय कथाकार बनतील असे कुणी भाकीत केले नसते.

यामुळेच, कदाचित, असेल की, भोवे यांच्या प्रस्तुत संग्रहातल्या कथा जे हा जेव्हा वेगवेगळ्या नियतकालिकातून प्रसिद्ध झाल्या तेव्हा तेव्हा त्या वाचण्यात आल्या तरी त्यांचा मनावर सलग असा ठसा उमटू शकला नाही. वाचताना एका संगीताच्या दर्दी माणसाच्या गोष्टी हा चष्मा डोळ्यावर राहिल्याने त्या त्या कथेचे अंगभूत कारुण्य, सामर्थ्य आणि सौंदर्य हे पूर्णपणे लक्षात येणे राहून जायचे. 'शापित गंधर्व' हा संग्रह हातात वाचावयास घेतला तेव्हा हा पूर्वग्रह आणि या कथा तर वाचल्याच आहेत ही भूमिका होती. असे असूनही हा कथासंग्रह वाचावयास घेण्याचे कारण म्हणजे श्री. भोवे ही व्यक्ति. साहित्य आणि संगीत या क्षेत्रात श्री. भोवे यांचा जो निर्व्याज व निरपेक्ष संचार आणि संपर्क आहे तो माणसाना जोडणारा आणि आपलेसे करणारा आहे. भोव्यांच्या साहित्याने मोहित माणूस त्यांना भेटावयास आतुर असतो तितकाच भोवे यांच्या परीचयामुळे त्यांच्या साहित्याकडे ओढला जातो. दोन्हीमुळे भोवे आणि साहित्य यांचा स्नेह वाढत जातो.

'शापित गंधर्व' वाचावयास घेतले आणि ते वाचून पूर्ण होईपर्यंत सोडवले नाही. 'बऱ्याच दिवसानी' रसोत्कर्षाचे अनुभव देणारे पुस्तक (कथा) वाचल्याचा आनंद झाला. 'बऱ्याच दिवसानी' म्हणावयाचे कारण की अलिकडे आधुनिकतेचा घाट व थाट या थोतांडात दर्दभऱ्या कथांचा विस्तार व परिमाण (एक जी. ए. कुलकर्णी यांचा अपवाद ) ह्याना वाचक वर्ग मुकत चालला आहे. आजच्या विशिष्ट सफाईने लिहिलेल्या काही तथाकथित प्रतिष्ठेत मोजक्या नियतकालिकातल्या कथा पाहिल्या तर वाटते की, वरवरचे मनोविश्लेषण किंवा जीवनाचे पर्णराशी, फुलानी बहरलेले, झाड काटून छाटून ओंडका सादर करणे म्हणजे कथामय जीवनदर्शन. त्याच प्रमाणे भावनामयतेचे विश्व अंकित करणे म्हणजे दौर्बल्य. म्हणून बऱ्याच वेळा अशा कथा वाचताना ना तरलतेचा प्रत्यय येतो ना चित्ताला स्पर्श होतो. भोवे यांच्या श्रद्धा सौंदर्यवाद, शुचिता आणि ध्येयवाद या त्रिपुटीने घडवलेल्या आहेत व त्या पक्क्या व सच्च्या असल्याने या श्रद्धेच्या अनुषंगाने आविष्कृत होणारे मन स्वच्छ व आर्द्र आहे. जे मन वेगवेगळ्या थोर व्यक्तींच्या अनुगमात कौतुकाने डुलते तेच त्यांचे आंतरजीवनाचे पापुद्रे उकलून पाहताना कमालीचे हेलकावते. 'सीमंतिनी' 'बायाक्का' 'गोरबीबाई' या कथा या दृष्टीने पुनः पुन्हा वाचाव्याश्या वाटतात. कामपूत प्रेम आणि पार्थिव प्रेम, वांच्छित जीवन व शापित जीवन यांच्या सत्वपरिक्षेतून जगणे गेले म्हणजे त्याला काय स्वरुप येते याचा आलेखच या कथातून उत्कटला आहे. 'तस्करा हा ऽऽऽ ती' 'नजरा नहीं आंदावे' 'कित गयो बावरी बना' या कथातून व्याकूळ कारुण्य, भावनाविवशतेला ओलांडून गेल्याने अतीव शोकान्त झाले आहे. भोवे भारून जातात व भरून लिहितात. याचा मालमसाला विचारात घेतल्याखेरिज अशा कथांची वीण कळणार नाही.

संगीताने वेडे झालेले, संगीत साधनेचा ध्यास घेतलेले जे कलावंत असतात त्यांच्या







जीवनात दिव्य–भव्य व करुण–कठोर असे प्रसंग आलेले असतात. त्या प्रसंगातूनच तावून सुलाखून निघाल्यावर त्यांचा 'कस' सिद्ध झालेला असतो पण काहींच्या बाबतीत हा 'कस' सिद्ध व्हावयाच्या पूर्वीच 'अस्' अस्तंगत होण्याची शोकांतिका उद्‌भवलेली असते. परन्तु हे सारेच घटित असे क्षम असते की, ते भावजीवनावर आपला असा गहिरा ठसा उमटवून जाते. यामुळेच या कलावंतांची अक्षराशी आयुष्यराशी मिळालेली नसली तरी असे जीवन विसरले जात नाही. ते संगीताच्या दुनियेतील लोकस्मृतीत घर करून राहते. त्या दुनियेत एक फेरफटका मारला तरी एखादा किस्सा, एखादी आसवे दाटलेल्या पापणीची कहाणी आणि एखादी झलक ऐकायला मिळते व वृत्ति मोहरून किंवा अंतर्मुख होऊन जाते. मग विचारानेच सारं जाणून घ्यायचे आणि मनाचे प्रवर्तन आणि आवर्तन अनुभवावयाचे एवढाच काय तो मार्ग उरतो. कारण त्या त्या प्रसंगाला जी धार आणि परिमाणे असतात त्यांचा प्रत्यय प्रत्यक्ष ते जग डोळ्यापुढे यथार्थपणे शब्दारले तरच परिणामकारकरित्या साकारते. परन्तु याला लागते सहानुभूति. अनुभवातील स्वानुभव आणि परानुभव यातील अंतर या सहानुभूतीने फिटते आणि कल्पनेने निर्माण केलेल्या प्रतिमा तो अनुभव अधिकाधिक उठावदार व्हावा म्हणून फेर घरतात. खुद्द भोब्यांनीच तोंडी सांगितलेल्या कथा जेव्हा कथारूप झाल्या तेव्हा त्यांचे स्वरूप पाहाता पाहता बदलले ते असे.

मात्र एक गोष्ट श्री. भोबे यांना म्हणावी तितकी साधली नाही. ती अशी की, कथा मांडताना त्यांच्या चिंब भावनाना पूर्ण अलिप्तता आली नाही. त्यामुळेच त्यांच्या निवेदनाला गच्चपणा येत नाही. तसेच घनत्व लाभत नाही. कणाकणाने कथा बांधणे जिला म्हणतात तिचा काही प्रमाणात भोबे यांच्यात अभाव आहे असे जाणवले. यामुळेच त्यांच्या कथेतील पात्रापेक्षा कथांचे निवेदन करणारा सारखा डोळ्यापुढे राहतो. यामुळेच त्यांच्या रसदार कथाना सूचकतेचा पिळ नसतो. पहिल्याच कथेत शेवटचे दोन परिच्छेद गाळले असते तर त्यातल्या त्यात कथेला अधिक वजन आले असते. त्यातहि शेवटच्या परिच्छेदाचा Melodrama अनावश्यकच आहे. 'तस्करा' कथेतहि अजून काही जास्त सांगितल्याशिवाय शोकांतिका ठसणार म्हणून निवेदन आले आहे. वास्तविक 'तो गेल्या दिशेकडे मरगळलेल्या दृष्टीने मी पाहतच राहिलो. पहाटेचा तो संधिकाल मला अधिकच भोववू लागला. एक अदृश्य मोतीचे भूत माझ्या दृष्टीसमोर वाढू लागले. माझे डोळे उगाचच भरून आले' या वाक्याने कथेचा शेवट झाला तर आहे त्या स्थितीत कथेला अधिक कलात्मकता येईल.

भोबे यांच्या कथा वाचताना हा दोष तसा फार खटकत नाही. कारण त्यांची समर्थ भाषाशैली. पान २४ वर 'आम्हींही तरुण मंडळी–नुकतेच काहीतरी विशेष ऐकल्यामुळे व स्मृति उसवल्यामुळे काही जुन्या गोमंतकीय वादकांच्या आठवणी उगाळीत बाहेर उभे होतो' पान ९१ वर 'तिने एका नाचय्यावर मोहोब्बत केली आणि ती त्याच्याबरोबर कोठीवरून खाली उतरली. पक्ष्याला एकदा माणसाचा हात लागला इतर पक्षीजात पुन्हा त्याला आपल्यात घेत नाहीत. त्याला टोचून टोचून मारतात. त्या नर्तकीची तीच गत झाली' आणि पान १११ वर 'या प्रश्नाने गोरवीची मुद्रा तात्काळ उतरली. ती दिङ्मूढ झाली. एक भले मोठे प्रश्नचिन्ह लपटले' तिच्या सर्वांगाला हा वानगी दाखलची वाक्येच याकरता बस् आहेत. एक लक्षात ठेवले पाहिजे. या आहेत गंधर्वांच्या कथा पण हे गंधर्व शापित आहेत. भोबे अनुग्रहित गंधर्वांच्या कथा केव्हा लिहणार याची वाट पाहत आहे.

**–दा. गो. देशपांडे**

पण दीप मालवला आहे. अपेक्षा सार्थ होत्या–**संपादक**

[**शापित गंधर्व. ले. गोपाळकृष्ण भोबे**
बा. ल. पाठक प्रकाशन, गिरगांव मुंबई–४]

## व्यक्तिदर्शन घडविणारा छानदार कथासंग्रह

**कथा** किंवा लघुकथा म्हणजे एक प्रमुख घटना आणि एक परिणाम करणारे कथा निवेदन, असे समीकरण अलीकडे बरेच रूढ आहे. हे समीकरण नाडकर्णी यांच्या कथांमधून पाळले जाते असे वाटत नाही. त्यांच्या कथांमधून व्यक्तिदर्शन आणि मनोविश्लेषण यावरच भर असतो. एखाद्या मामुली प्रसंगाने त्या व्यक्तिदर्शनास आणि मनोविश्लेषणास चालना मिळते एवढेच. कित्येक वेळा वर्तमानातील काही प्रसंगाच्या निमित्ताने त्या त्या व्यक्तीचे पूर्व जीवनकथनच धात येते व ते वर्तमान प्रसंगापर्यंत आणून पोचविलेले असते. "आम्हा हेचि भांडवल" या कथेत आजच भक्तिभावाने कीर्तनाचा व्यवसाय करणाऱ्या कीर्तनकाराची त्याच्या अखेरच्या दिवसातील संशयारूढ मन:स्थिती चित्रित केली आहे, व अर्थात् त्याचे थोडक्यात चरित्र आले आहे. 'मर्त्य' या कथेत उडिपीच्या हरिहराची जीवनकथा सांगितली गेली आहे, "दुर्मिळ निशाचरा"च्या कक्षेत सामान्य चाकोरीच्या बाहेरचे, परंतु अपयशी जीवन जगणाऱ्या व्यक्तीची कथा मधील मधील प्रसंगांच्या आधाराने निवेदिली आहे. तेव्हा प्रस्तुत कथांचे तंत्र लघुकथेच्या अलीकडील साच्यामध्ये बसणारे नाही. यात व्यक्ती म्हणा, किंवा वल्ली म्हणा, याचे दर्शन अभिप्रेत असते, आणि त्यातही मनोविश्लेषाला अधिक महत्व असते.. केवळ स्वभावचित्रणाला नाही. या व्यक्ती सरळ, साध्या अशा नसतात. अनेक वेळा ...ग भग्नाश, परिस्थितीने मार दिलेल्या, काहीशा चमत्कारिक, कदाचित वि...प्त, जीवनात अयशस्वी, दुःखी आणि केव्हा ...व्हा रूढ नीतीला धरून नसणारे जीवन व्यतीत करणाऱ्या अशा असतात. मद्यपानाचे व्यसन या परिस्थितीत अनेकदा उल्लेखिले जावे हे ओघानेच येते. या व्यक्तीमध्ये घर आणि देश सोडून इंग्लंडमध्ये तरुण वयातच परागंदा झालेला व अखेरीस







मनात असले तरी पायदेशी परतू न शकणारा "हरिहर" आहे. पार्टीच्या प्रचाराचे खडतर कार्य सोडून लग्नामुळे सुखासीन जीवन जगणारा, पण तऱ्हेवाईक स्वभावाच्या बायकोमुळे आपल्या मनाविरुद्ध वागण्याचा प्रसंग आलेला, मनाने दुःखी असणारा रत्नाकर आहे, घरची स्थिती मुळात चांगली असताना दिशाहीन आणि कर्तृत्वशून्य जीवन व्यतीत करणारा, मनाने चांगला, पण आचाराने अनैतिक ठरलेला निशाचर लोखंडे आहे, सावत्रपणाचा जाच मुकाट्याने सहन करण्याची सवय लागलेला, सावत्र आई मेल्यावरही आपल्या सावत्र भावाकरिता कष्ट करणारा कर्मदरिद्री गंगाधर आहे. आणि आईच्या मृत्यूनंतर जवळचे कोणी नसलेला, आणि म्हणून जीवनाच्या तारूचे सुकाणूच मोडून गेलेला व अखेरीस अपघाताने मरण पावला तरी शोक करणारे मागे कोणीही नसणारा अभागी वृंदावन आहे.

बहुतेक कथांचे स्थल मुंबई हेच आहे. तेथील बहुविध जीवनाची नाडकर्णी यांना चांगली ओळख आहे. एकदोन कथात मुंबईबाहेरचे आणि इंग्लंडमधील जीवनही येते. नाडकर्णी यांनी विविध क्षेत्रातील अनुभवांची समृद्धी संपादिली असल्याचे या कथांवरून स्पष्ट दिसते, आणि त्यांत संबंध आलेल्या व्यक्तींचे दर्शन डोळसपणे आणि मार्मिकपणे त्यांनी घेतले असल्याचेही जाणवते. निवेदनामध्ये कथा कमी असली, तरी त्याची उणीव लहानसहान प्रसंगांच्या साह्याने ते चांगली करू शकतात. त्याच्या जोडीला सूक्ष्म तपशीलाचे बिनचूक वर्णन, नावीन्यपूर्ण प्रतिमायोजन, लवचिक भाषाशैली इत्यादी लेखनगुणाचे दर्शनही या कथांमध्ये होते.

या कथा काही तात्पर्य किंवा विशेष लक्षणीय आशय सांगण्याकरिता लिहिल्या नाहीत. लेखकाची भूमिका किंवा हेतू तो नाहीच. अथवा शिकवण देण्याचा उद्देश अर्थात नाही. फक्त लेखकाला लक्षणीय वाटलेल्या व्यक्ति किंवा त्यांचे जीवन वाचकांपुढे कलात्मकतेने उभे करण्याचा त्याचा प्रयत्न असतो. प्रसंगीरूढ नीति-विचारांशी विसंगत अशा जीवनाचीहि ती चित्रे आहेत. क्वचित्, उच्छृंखल किंवा उल्लू व्यक्तीचेही चित्र त्यांमध्ये पहावयास मिळते. त्यासंबंधी नापसंती किंवा प्रतिकूलताही त्याला अभिप्रेत नसते. कीर्तनकारबुवांचे अत्यंत सहृदयतेने आणि सहानुभूतीने चित्रण करूनही वृत्तीने व्यापारी असलेला धोंडूशेठ आणि त्याची रखेली रत्ना ही दोघे मनाने अधिक सुखी व आनंदी असल्याचे, किंवा रूढ कल्पनाप्रमाणे यशस्वी झालेल्या प्रभाकरापेक्षा अयशस्वी आणि समाजबहिष्कृत निशाचरामध्ये अधिक माणुसकी असल्याचे लेखक दाखवून जातो, पण हे सांगण्याकरिता म्हणून या कथा लिहिल्या असे नाही. माणूस हा असा असतो आणि त्याचे जीवन हे असे असू शकते, एवढेच त्यास सांगावयाचे असते. लेखक स्वतः ते जेवढ्या अलिप्तपणे सांगतो, तेवढ्या अलिप्तपणे त्याकडे पाहू शकणाऱ्या आणि सूक्ष्म मनोगाहनाची आवड असणाऱ्या रसिकांना लक्षणीय वाटतील अशा या कथा आहेत, आणि हे यश काही अल्प आहे असे नाही.

**—प्रा. रा. श्री. जोग**

[ **चिद्घोष. ले. ज्ञानेश्वर नाडकर्णी** मौज प्रकाशन, मुंबई–४. मूल्य ८ रु. ]

---

[ पृष्ठ ५५ वरून—**रंगमंच** ]

कौला'चा अभिनव प्रयोगही करून पहावा. स्पर्धेसाठी नवीन नाटके मागवावीत. त्यातली एक दोन निवडून त्यांचे प्रयोग रंगायन, आय्. एन्. टी., पी. डी. ए. वा महाराष्ट्र कलोपासकासारख्या संस्थांकडून बसवून घेऊन उत्तम नाटक कसे असावे (व कसे पहावे) ह्याचा वस्तुपाठ घालून द्यावा. ह्या स्पर्धांच्या निमित्त एखादे अनौपचारिक संमेलन भरवण्यात यावे. त्यात नटवर्य केशवराव दाते, मामा पेंडसे, के. ना. काळे, "मालवा फळकर, राजा नातू, मतकरी, 'दिग्दर्शक' गोखले वगैरे सारख्यांचा एखादा परिसंवाद आयोजित करावा वा स्पर्धा संपल्यावर एक प्रेक्षक संस्थांचा संयुक्त परिसंवाद घेण्यात यावा अशा काही सूचना ह्या स्पर्धेच्या निमित्ताने कराव्याशा वाटतात.

सर्वात शेवटी पण महत्वाचे म्हणून मी महाराष्ट्र शासन, नामदार भारस्कर, व ह्या खात्याचे एक 'प्राणभूत' अधिकारी व ह्या स्पर्धांच्या मागली एक सुप्त–प्रगट शक्ति म्हणून श्री. राजाराम हुमणे यांचे अभिनंदन करतो.

ऐहिक जमाखर्च (कदाचित) तोट्यात असेल. पण कलात्मक?

माझ्या मते खूप खूप फायद्याचा!!,

**—चित्रगुप्त**

---

## साभार पोंच

**साधना प्रकाशन, पुणे**

**मातीखालची माती**
ले. आनंद यादव
मूल्य ८–०० रु.

**विभ्रमा**
ले. देवीदास बागूल
मूल्य २–५० रु.

**ज्वाला आणि फुले**
ले. बाबा आमटे, रमेश गुप्ता
मूल्य ४–०० रु.

**हे व्यर्थ न हो बलिदान**
ले. गोपाळ किराणे
आनंदवन प्रकाशन
मूल्य २–५० रु.

**कालिदास काव्य–कथा**
ले. वि. के. छत्रे
युवा प्रकाशन, कल्याण
मूल्य १–५० रु.

**कठपुतळीचा खेळ**
ले. दीनानाथ लाटे
युवा प्रकाशन, कल्याण
मूल्य ४–०० रु.

**गोवा माझा सुखाचा**
अनु. प्र. श्री. नेरूरकर
मूल्य ८–०० रु.

●●●



अनुक्रमणिका

[पृष्ठ १० वरून — हिसका]

मग मात्र मी भलताच उखडलो. 'मरोती सहल आणि मरोत ती मुलं' असं पुटपुटत मी सायकल उचलली. तोच आपल्या वक्तशीरपणामुळे 'नेपोलियनचा सख्खा बाप' अशी प्रसिद्धी मिळालेला राम येताना दिसला. त्याला शिव्या देत अर्धा तास कसाबसा घालवला. आता मात्र एक एक वल्ली जांभया देत उगवू लागल्या. सातपर्यंत ४१ जणांपैकी फक्त २५ जण जमले होते.

मुख्य म्हणजे शोभाचा पत्ता नव्हता. इतर मुली "आई ग बाई ग" करीत कशाबशा जमल्या. ७॥ वाजले. आमची वाट पाहून प्रा. साने स्वतः हजर झाले. पण शोभा आली नाही हे पाहून त्यांचा उत्साह ढेपाळलेला दिसला. 'जाताना आम्हाला हाक मारा' असं बजावून ते आले तसे परतले.

आठच्या सुमारास 'कोरम फुल' झाला. शोभा व साने सर सोडून सगळे जण हजर झाले. आता शोभाची वाट न पाहता निघावं असं माझं मत होतं. पण मुलं काही केल्या ऐकेनात. तिची अर्धी चड्डी व गंजिफ्रॉक सगळ्यांच्या डोळ्यांसमोर दिसत असावा. मुलींमध्ये मात्र रागाचे उद्गार सुरू झाले.

'ईश्श, काय बाई शिष्टपणा.'

'न येई ना का ती.'

'तिला काय लोणी लागलंय् चाटायला'?

'करा म्हणावं लाळघोटेपणा.'

फटाक्यांचे सर फुटत होते. पण कुणीच त्यांच्याकडे लक्ष दिलं नाही.

या वागण्याचा त्या कोमल मनाच्या मुलींवर अर्थातच फार परिणाम झाला. आपल्याकडे कुणी ढुंकूनही पाहू नये आणि त्या आगाऊ महामायेची इतकी वाट पहावी, या अपेक्षाभंगाने चिडून त्या सगळ्या मुली माझ्याकडे आल्या.

'अहो, देशपांडे, आम्ही जातो.'

'जा' मी एका शब्दात उत्तर दिलं. वास्तविक मी जरा आग्रह करायला हवा होता. पण खरंच मी इतका वैतागलो होतो

# वैकुंठवासी का. दा. नायक



ह्या देशातल्या, विशेषतः महाराष्ट्रातल्या ज्या पिढीने काही निष्ठा जपल्या, मूल्ये मानली, श्रद्धेने आपल्या आयुष्याचा कणन्क्षण 'कार्य'कारणी लावला अशा पिढीतील एक श्रेष्ठ गोमंतकीय विवंगत झाले आहेत. त्या गोमंतकीय कार्यकर्त्याचे नांव **काशिनाथ दामोदर नायक**! गोव्याच्या व मराठीच्या इतिहासात का. दा. नायक हे नांव केवळ १९६४ साली भरलेल्या साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष म्हणून नव्हे तर एक थोर समाजसेवक, साहित्यिक, संशोधक, शिक्षणाविषयी आणि समाजातल्या विविध ज्ञानविषयक कार्याबद्दल आपुलकी मानणारा एक थोर, सज्जन गृहस्थ म्हणून अजर–अमर राहणार आहे. व्यापारी असून साहित्यिक म्हणून त्यांचा उल्लेख करता येण्यासारखी वस्तुस्थिती असली तरी ते वृत्तीने मात्र 'साहित्यिक'च होते. 'व्यापारी' नव्हते. व्यापार-उद्योग हा एक योगायोग असतो. पण नायकांनी साहित्य-संशोधन हा मात्र 'योग'च मानला. उत्तम लेखक–संशोधकाला पुस्तकांचे वेड असते, असावे लागते. नायकांना पुस्तकाचे वेड होते. पण पुस्तकांचा 'मोह' मात्र नव्हता. त्यांनी हजारो रुपयांची ही पुस्तके आता मडगावच्या गोमंत विद्यानिकेतनला देऊन टाकली. गोमंतकाची भाषा मराठी आहे ही त्यांची नुसती श्रद्धा नव्हती. तो त्यांच्या संशोधनाचा निष्कर्ष होता. आणि म्हणूनच त्यांनी 'गोमंतवाणी' ह्या मुखपत्राच्या उभारणीत पुढाकार घेतला. 'गोमन्तकाची सांस्कृतिक घडण' हा त्यांचा ग्रंथ मुद्रित झालेला पाहण्याचे भाग्य त्यांना लाभले. नायकांचे ते पहिलेच पुस्तक प्रसिद्ध होत असले तरी भारतातील ग्रामसंस्था व जुन्या भारतातील नागजात हे ग्रंथ त्यांनी लिहून पूर्ण केले आहेत. त्या नांवांवरूनच त्या ग्रंथाचे मौलिकपण व आगळेपण आपल्या सहज ध्यानी येऊ शकेलसे वाटते. स्फुट, संशोधनात्मक लेखन तर त्यांनी विपुल केले आहे. 'दीपावलीच्या' वाचकांत तर गेल्या दिवाळी अंकातील त्यांच्या हेमाडपंतांवरील सृजनशील लेखाने बरेच कुतुहल निर्माण केले होते. गोमंतकातील ख्रिस्ती आदिवासी, बुद्धशिष्य पूर्ण हा 'गोमंतकीय' ही नावेही 'स्वतंत्र' संशोधनशक्ति असल्याचे पटवून देतात. ग्रंथ खूप जमवले. पण शोभा, फॅशन, फॅड म्हणून नव्हे, तर व्यासंग म्हणून. 'संदर्भ' मनात कोरलेले असतात. आठवतही असत. नायकांचे वक्तृत्व हे व्यासंगी असे. मौलिक चिंतनातून ते आलेले असे. व्याख्यानात 'पसारा' उथळपणा नसे. चोख, मुद्देसूद आणि विचार करायला लावणारे असे. संशोधनाने माणसे रुक्ष बनतात. पण तातांची स्थिति तशी नव्हती. ते रसिक होते. कलांचा, साहित्याचा आस्वाद घेण्याची त्यांची वृत्ति होती. त्यामुळे अनेक सामाजिक व कलाविषयक कार्य करणाऱ्या संस्थांना "का. दा. नायक" हे आधार वाटत. त्यांच्या घरी माणसांचा राबता असे. प्रेमयुक्त आदर व आदरयुक्त प्रेम साऱ्यांना वाटावे असे "का. दा." हे गोव्याचे 'सार्वजनिक काका' होते. घट्ट पाय रोवून गोमंतकाच्या मातीत मराठीची मनोभावे सेवा करणारा मूलगामी संशोधनात मन घालून रमणारा असा हा 'वटवृक्ष' होता. छाया होती ती! आज तो उन्मळून पडला आहे. भाषांचे वेड, नाण्यांचे वेड, तिकिटांचे वेड आणि ग्रंथांचे त्यांना वेड होते. ते उथळ व शाळकरी नव्हते. त्याला शिस्त होती. श्रम होते आणि साधनाही होती. यातही गोमन्तकाचा अभिमान होता. हे 'धन' गोव्याबाहेर जाऊ नये असा त्यांचा आग्रह होता. तो त्यांनी निर्धारपूर्वक पाळलाही!

श्री. काशिनाथबाबांच्या मृत्यूने केवळ गोमंतकाचीच, महाराष्ट्राचीच नव्हे तर मराठी भाषा, संशोधन व इतिहासाचीही हानी झाली आहे. जन्म आहे तिथे मृत्यूचेही वास्तव्य असतेच. पण तरीही वाटत राहतेच की महाराष्ट्र-गोमंतकाच्या मीलनासाठी, मराठीच्या मौलिक सेवेसाठी ताता आज हवे होते. 'दीपावली'ची त्यांना ही आदरांजली!

—संपादक








की, वाल्या कोळ्याप्रमाणे 'मरा मरा मरा' असा जप करण्याचं स्फुरण मला सारखं येत होतं.

सगळ्याच्या सगळ्या मुली अपमानाने फणफणत चिडून निघून गेल्या. उरलो आम्ही सगळे बालब्रह्मचारी! थोड्याच वेळात 'मिस् नाडकर्णींना बोलावून आणतो' म्हणत ८–१० मुलं गेली. ती पुन्हा परत आलीच नाहीत. १५–२० मिनिटात उरलेल्या मुलांना गळती लागली. १० वाजेपर्यंत मी, मन्या वगैरे सात मुलंच उरलो.

आम्ही जास्त विचार न करता सायकलींवर टांग टाकली. जाताना शब्द दिल्याप्रमाणे प्रा. सान्यांच्या घरी गेलो. साने बायकोबरोबर खरेदीला बाहेर पडत होते. सान्यांच्या पत्नी शोभापेक्षा कितीतरी पटीने सुंदर होत्या. पण. . . . ! शोभा नाही म्हणजे साने येणार नाहीत हे उघड होतं. आम्हाला पाहताच सान्यांनी 'नागरिक व त्याची कर्तव्ये' या विषयावर लेक्चर झोडायला सुरुवात केली. रविवार असूनही मुलांसमोर लेक्चर झोडायला मिळाल्याने ते खूष दिसले. सौ. सान्यांचा मेकअप निस्तेज झाला आणि आमच्या पोटातला संपूर्ण लोणावळा खंडाळा ढवळून निघाला. तेव्हा कुठे आमची सुटका झाली.

आमच्या सात जणांच्या सायकली मुंबई–पुणे मार्गाने बेफाम निघाल्या. शिवाजीनगर रेल्वे क्रॉसिंगमार्गे आम्ही मुख्य रस्त्यावर आलो. आणि समोरचं दृश्य पाहून आमचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. शोभा नाडकर्णी आमची वाट पाहात एका झाडाखाली उभी होती. अर्धी चड्डी वगैरे! आम्हाला पाहताच तिने हात वर करून इशारा दिला. आम्ही मनातून आनंदाने खदखदू लागलो.

शोभाने केलेला खुलासा ऐकून आमची हसता पुरेवाट झाली. ती सकाळपासून आमच्या मागे मागेच होती. हिंदविजयसमोरच्या इराण्याच्या हॉटेलात तिचं आमच्यावर लक्ष होतं. ती मुली नाही हे पाहून साने सर व इतर लाळघोटी मुलं कटतील आणि खऱ्या सहलीची आवड असणारी मुलंच उरतील असा तिचा कयास होता. आम्ही सान्यांच्या लेक्चरचा मारा खात होतो त्यावेळी शोभा पुढे येऊन आमची वाट पहात बसली होती.

'Come on let us enjoy the day now.' शोभा सायकलवर स्वार होत म्हणाली.

आमच्या सायकली विलक्षण चैतन्याने लोणावळ्याकडे आगेकूच करू लागल्या.

'ब्रेव्हो सप्तर्षि आणि अरुंधती' मन्या ओरडला. या विनोदाचं शोभाने गोड हसून स्वागत केलं. मग मात्र सगळी बंधनं तटातट तुटली आणि उंडारलेल्या वासरांसारखी आमची स्थिती झाली. सारा मुंबई–पुणे रस्ता आम्ही दणाणून सोडला.

शोभाला खूष करण्याची आमच्यात कळत न कळत चुरस लागली. विनोदाचे ॲटम बॉम्ब फुटू लागले. एकमेकांवर विनोदासाठी आम्ही हल्ले करू लागलो. उणी दुणी काढू लागलो. शोभाला हसविण्याच्या नादात प्रत्येक मित्र एकमेकांच्या वर्मावर बोट ठेवून त्याचं वस्त्रहरण करण्याच्या प्रयत्नात दंग झाला. प्रत्येकजण मनातून भडकला होता पण शोभासमोर शोभा नको म्हणून गप्प राहात होता.

एकमेकाना पुरेसं घायाळ केल्यानंतर आमच्या विनोदाचा मोर्चा सहजपणे रस्त्यावरच्या वाटसरूंकडे वळला. सायकलवरून जाताना एखाद्या खेडुताचा फेटाच उडव, कुणाची टोपीच पाड, कुणाच्या समोर सायकल डगडग करून त्याला दचकव असल्या माकडचेष्टा आम्ही सुरू केल्या. शोभाही या चेष्टेत सामील झाली. आणि तिथेच चुकलं.

आम्ही एखाद्या वाटसरूची टिंगल केल्यास शोभा मोठमोठ्याने हसायची. आम्ही अधिक चेकाळायचो. जो दिसेल त्याची चेष्टामस्करी करायचो. शोभानेही एकदोघांच्या टोप्या पाडण्याचा विक्रम केला, मग मात्र जास्तीत जास्त धाडसी खोड्या करण्याची आमच्यात चुरस लागली. टोप्या किंवा फेटे उडवल्यावर काही जण नुसत्या आश्चर्याने पहात बसायचे, काही शिव्या द्यायचे तर काही संतापत आम्हाला पकडण्यासाठी आमच्या मागे धावू लागायचे.

असा एखादा संतापलेला 'पाव्हणा' दिसला की मोठी मजा यायची. तो शिव्या देत आम्हाला पकडायला धावू लागला की आम्ही खेळ सुरू करायचो. तो जवळ येईपर्यंत सायकली हळूहळू पळवायच्या आणि हातभर अंतरावर आल्यानंतर जरा जोरात पाय मारून पुढे पळायचं, जरा थांबायचं. संतापलेल्या त्या खेडवळाला जरा आशा वाटू लागायची. तो जोर लावून पळत जवळ यायचा. आम्ही पुन्हा गुल्!

मन्याने तर एकदा मजाच केली. त्याने सरळ सायकल एकदम वळवली आणि मागे पळत येणाऱ्या खेडुताच्या अंगावरच घातली. सायकल चुकविण्यासाठी तो खेडुत वळला आणि रस्त्यावरच पालथा आपटला. मन्याने पुन्हा सायकल वळवून वेग घेतला. खेडुत पडल्यामुळे शोभासारखी खुसखुसत होती. मन्याची छाती आपल्या पराक्रमाने फुगली होती. आम्ही मनात जळत होतो. तोच आम्हालाही पराक्रम दाखवायला संधी मिळाली.

पिंपरी ओलांडून आम्ही चिंचवडपर्यंत येऊन पोहोचलो होतो. चिंचवडच्या रस्त्यावरून दोघं तिघं पहिलवान गडी आमच्या समोरून येताना आम्हाला दिसले. त्यांच्या खांद्यावर चांगल्या दणकट काठ्या होत्या. त्या काठ्यांच्या टोकाशी त्यांची गाठोडी लटकत होती. मी, मन्या आणि रघ्या अशा तिघानी आपसात नेत्रपल्लवी केली. सगळ्यांच्या सायकलींनी तुफान वेग घेतला. ते खेडुत जवळ येताच एका क्षणात त्यांच्या काठ्यांवर टांगलेली गाठोडी आमच्या हातात आली. सायकली भरधाव निघाल्या. खेडुत चांगलेच तगडे होते. त्यानी विलक्षण वेगाने तोंड व पाय चालवले. एकदा तर रघ्या सापडताच होता. पण सुदैवाने बचावला. थोड्याच






वेळात आम्ही गाठोडी त्यांच्या अंगावर भिरकावून दिली. फार मजा आली.

सहलीला 'भलताच' रंग चढत चालला होता. हासत खिदळत आम्ही पुढे दोन तीन मैलांचा पल्ला गाठला. दुपारची वेळ असल्याने रस्ता निर्मनुष्य होता. मधून मधून धावणाऱ्या ट्रक्स–मोटारी-शिवाय दुसरी जाग नव्हती. भूकही सपाटून लागली होती. तळेगावला पोहो-चल्यानंतर डबे सोडण्याचा आमचा विचार होता.

तोच शोभा मोठ्याने किंचाळली. आमचंही लक्ष समोर गेलं आणि भूत पाहिल्याप्रमाणे आम्ही दचकलो. तासा-दीड तासापूर्वी ज्यांची गाठोडी आम्ही पळवली होती ती पहिलवान मंडळी कमरे-वर हात ठेवून आमच्यासमोर उभी होती. 'आम्ही त्यांना मागे टाकलं असताना हे आमच्यापुढे कसे आले' हा प्रश्न आमच्या प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दिसत होता. गांग-रून गेल्यामुळे काय करावं हे आम्हाला सुचलंच नाही.

ते तिघे राक्षस क्षणात पुढे आले. आमच्या सायकलींना अंगची कुलपं होती ती त्यांनी खटाखट बंद केली आणि किल्ल्या खिशात टाकल्या. आता कुठे परिस्थितीची जाणीव होऊन आमच्या दातखिळी बसल्या. आमच्याकडे पहात एक पहिलवान मिशीला पीळ देत मिस्किल-पणे म्हणाला,

'काय राव, कसा आहे गाठोड्याचा हिसका'?

'पऽपऽपण तुम्ही. . .' मी चाचरलो.

'आमी ट्रकवर बसून तुमच्या फुडंच उतरलो, मर्दा! बोला आता काय इच्चार आहे?'

दुसरा बाह्या सरसावीत मधेच म्हणाला, 'काऽकाऽकसला विचार?' मी.

'न्हाई, मी म्हन्तो फुडं काय कराचा इच्चार आहे?' त्याने शांतपणे पुन्हा तोच प्रश्न केला.

'विचार? हां हां, आपला विच्चार होय? छे, छे, विचार कसला? नाही नाही विचार नाहीच!' मी तोंडाला येईल ते बोलू लागलो.

'त्ये बराबरच हाय!' तो.
'होय, बरोबर आहे.' मी.
'काय बराबर हाय? तो.
'त्ये.' मी.

न्हाई, मी म्हन्तो, इचार असता तर ह्यो गाडावपना तुमी कयेलाच नस्ता.'

'काही नाही पैलवान, जरा आपली गंमत. . . . . .'

मन्या बोलू लागला. तोच एकाने त्याच्या खाडकन् मुस्काटात भडका-वली. एक कोलांटी खाऊन मन्या तोंडा-वर आपटला. त्या हातातल्या ताक-दीचा प्रत्यय आल्यानंतर तर आमच्या-पैकी प्रत्येकजण थरथर कापू लागला. पडलेल्या मन्याला उठवून त्याच्या गालां-वरून नाजुकपणे हात फिरवीत तो खेडुत म्हणाला,

'रागावू नको हा सोन्या.' ही आपली आपली खेडुत मानसांची गंमत!'

यावर तिघेही राक्षस खदखदून हासले.

इतक्यात एकाचं लक्ष सायकलींना लावलेल्या आमच्या डब्यांकडे गेलं. त्यानी सायकली झाडांना टेकवून ठेवण्याची आम्हाला आज्ञा केली. ते तिघं एका प्रशस्त झाडाखाली बसले.

'आना रे भडव्यांनो त्ये डबं हिकडं!' एकाने हुकूम सोडला. त्यांच्याबरोबर का होईना दोन घास पोटात पडतील या आशेने आम्ही डबे घेऊन त्यांच्याशेजारी जाऊन पोहोचलो. शोभा दूरच उभी राहिली.

'त्यो कोन टिकोजीराव?' एकाने विचारलं.

'तो नाही ती आहे.'
'ती?'
'हो, ती. शोभा.'
'ती तुमची कोन?'
'आमची मैत्रिण आहे.'

'तिच्या आयला! सातात येक होय रं? आरं भुस्काट पाडाल की तिचं!'

'अहो, तसं काही नाही हं!' मी गयावया करीत म्हणालो.

'तरीच, त्यच्चा आयला, घाट इजार घालून आलीये बिचारी!'

तिघांनी हास्याचे मजले चढवले. शोभा रागाने आणि भीतीने पांढरी पडली.

'ए चिचुंद्री, हिकडं ये की.'
'जा रं नाम्या आण हात धरून तिला.'
शोभा मुकाटचाने आमच्याजवळ आली.
चल वाढ जेवान आमाला.'

शोभाने मुकाटचाने सगळे डबे त्यांच्या-समोर उघडे केले. पाच मिनिटात आमच्या सगळ्या डब्यांची विल्हेवाट लागली. त्याना खाताना पाहून तर आमची भुकेने कळवळणारी आतडी पोटातल्या पोटात उलटी पालटी झाली. एक कणही आमच्या वाट्यास आला नाही.

त्यानी 'होब्बा' करून ढेकर दिले. ही वेळ बरी असा विचार करून मी शहाण-पणाने म्हणालो,

'पैलवान किल्ल्या देता ना आता?'
'कुनाच्या?'
'आमच्या.'
'तुमच्या किल्ल्या तुमच्यापाशीच हाएत.'
तिघे पुन्हा गदगदून हासले.
'सायकलच्या किल्ल्या.' मी चिवटपणे म्हणालो.

'त्या सायकली मागतील. तुमी कशा-पायी मागताय्?"

'अरे नाम्या याना किल्ल्या द्यायच्या.' पन. . . . . . .'

'पण काय?' मी विचारलं, मी आता टेकीला आलो होतो.

'ही चिमनी नाच करून दाखवनार असल तर देतो.'

शोभा संतापाने थरथरत दूर जाऊन उभी राहिली.

हे पाहून ते तिघंही उठले आणि शोभाच्या गालांवरून हात फिरवीत चावटपणाने हासत जाऊ लागले.

आता मात्र खरी पंचाईत झाली. साय-कली कुलूप लावल्यामुळे निरुपयोगी झाल्या होत्या. दुपारचं ऊन रणरणत होतं. आम्ही धड इकडे ना तिकडे अशा आडरानात आडकलो होतो. पायी जावं तर सायकलींचं काय करायचं ते समजेना. ते तिघं जण तर शोभाकडे पाहात डोळे मिचकावीत, लावण्या गुणगुणत हळूहळू जाऊ लागले होते.

शेवटी सायकलींची मागली चाकं उच-लून धरीत आम्ही त्यांच्या मागे मागे जाऊ लागलो. किल्ल्या देण्याची विनवणी दीनवाणेपणे करू लागलो. सायकली उच-लून हात अवघडून जात होता. शेवटी चांगला मैलभर रखडवत नेल्यानंतर आमच्या किल्ल्या आम्हाला परत मिळाल्या.

'तुमच्या सारख्या मुर्दाडांबरोबर एक क्षणही थांबणार नाही.' असं तिरस्काराने म्हणत शोभाने पुण्याचा मार्ग धरला. आम्हीही तिच्या मागोमागच परतलो. अजूनही कधी कधी मला स्वप्नात खेडूत दिसतो आणि मी घाबरून ओरडत जागा होतो. • • •










दीपावलीची

सन्मानपुष्पें

# "जीवननिष्ठ" भाऊसाहेब खांडेकर

**प्रतिकूलतेवर** स्वार होऊन आपलें कर्तृत्व तावून सुलाखून घेणारी माणसे मला फार आवडतात. त्यात नाटच असते. काव्य असते. संगर असतो आणि संगर जिंकल्यानंतर येणारे समाधानही असते. अशा, मला खूप आवडणाऱ्या माणसात भाऊसाहेब खांडेकरांची गणना मी विद्यार्थी असतानाच केली होती. आणि कळविण्यास अत्यंत आनंद होतो की, गेल्या पंचवीस–तीस वर्षात ह्या बाबतीत मला कधी खंत वाटली नाही, पश्चात्ताप करण्याचा प्रसंगही आला नाही. खांडेकरांचे साहित्य आणि खांडेकरांची जीवननिष्ठा ह्या दोन्ही गोष्टीत एक समान सूत्र आहे. आणि ही एकात्मता हाच त्यांच्या व्यक्तित्वाचा फार मोठा व महत्वाचा असा भाग आहे असे मला वाटते. खांडेकरांचे वाङमय हा अनेकांच्या वाङमयाप्रमाणे वाद विषय होईल. झाला तरी भाऊसाहेबांना त्याची खंत वाटणार नाही. पण खांडेकर यांच्या व्यक्तित्वाबाबत दुमत होईल असे मला वाटत नाही. त्यांच्या साहित्यात त्यांच्या व्यक्तित्वाचे सर्व विशेष प्रकर्षाने जाणवतातच. पण त्यातल्या एका विरोधाचे मला जबर आकर्षण वाटत आले आहे ती गोष्ट म्हणजे त्यांची जीवननिष्ठा ! खांडेकरांचे मन हे कवीचे मन आहे. माणसातल्या व जीवनातल्या मांगल्यावर त्यांची श्रद्धा आहे. जीवनात अनेक आघात सोसूनही जीवनातल्या मांगल्यावरची, सौंदर्यावरची, माणसातल्या देवत्वावरची, माणसातल्या बुद्धि, श्रद्धा आणि गुणांवरची भाऊसाहेबांची श्रद्धा अभंग राहिली आहे. आणि म्हणूनच अनेक आघात सोसूनही खांडेकर 'सिनिक्'बनले नाही. तुच्छतावाद त्यांच्या आसपास फिरकू शकलेला नाही. जीवनातून त्यांनी विविध रस घेतले. त्या रसांनी स्वतःचे व्यक्तित्व संपन्न केले आणि लेखन भाषणाद्वारे ते विविध रस सुंदरतर, रुचिरतर करून परत जीवनाला प्रदान करून टाकले. आपल्यावर होणारी टीका खांडेकरांना समजू शकते. मागे एकदा दादरला त्यांचे एका संमेलन प्रसंगी भाषण झाले होते. तेव्हा ५०।६० प्रश्नांच्या अनुषंगाने त्यांनी भाषण केले. त्यात खांडेकरी कोटीबाजपणा, उपमा-दृष्टांत, सुभाषितांची रेलचेल इत्यादि बाबत बोलताना त्यांनी प्रामाणिक कबुली दिली की, प्राथमिक अवस्थेत कोल्हटकर-गडकरी यांचे संस्कार मनावर झाले. तशा भाषेचे त्या काळात आकर्षण होते. कौतुक झाले. तसे लिहिणे हेच चांगले लिहिणे असे मानले जात असे. तसा मी घडत गेलो. आज जी टीका माझ्यावर होते आहे ती २५ वर्षांपूर्वी झाली असती तर कदाचित मी बदलू शकलो असतो. खांडेकर मनाचे ऋजु आहेत. माणुसप्रिय आहेत. बोलके आहेत. प्रकृति–दृष्टि क्षीण झालेली असली आणि आजाराने पाठ सोडली नसली तरीही त्यांची साहित्यनिष्ठा अविचल आहे. त्यांची साहित्यनिष्ठा हीच मुळी त्यांची जीवननिष्ठा आहे. त्या निष्ठेतून त्यांना दोन गोष्टी साधल्या. व्यक्तित्व विकसित झाले. आणि साहित्याच्या कक्षा विस्तारल्या. खांडेकरांच्या बाबतीतली एक अत्यंत महत्वाची ( व त्या क्षेत्रात तशी दुर्मिळ) गोष्ट म्हणजे खांडेकरांनी आपण होऊन कितीतरी नव्या नव्या लेखकांचे अंगभूत मोठेपण जोखले आणि प्रयत्नपूर्वक त्यांचे ते मोठेपण मराठी वाचक व साहित्यिक यांच्या समोर मांडले. नव्यांचे वाचणे. त्यातली गुणवत्ता रसिकतेने जाणून घेणे आणि तिची नोंद घेणे व देणे ही गोष्ट खांडेकरांनी अनेक आजच्या व कालच्या लेखकांबाबत केले आहे. साहित्य निष्ठेतून व जीवननिष्ठेतून व्यक्तित्व विकसित झाल्यावर हे घडते कुसुमाग्रज–बोरकर–कानेटकर, गोखले यांजसारख्या कितीतरी माणसांच्या मुखातून मी प्रत्यक्ष ही 'जाण' ऐकलेली आहे. खांडेकर साहित्य दृष्ट्या 'निरोगी' प्रकृतीचे गृहस्थ आहेत, म्हणूनच 'स्वामी' कार रणजित देसाई ह्यांना त्यांनी माधवराव पेशव्यांच्या जीवनाविषयी केलेली सारी सामग्री दिली आणि 'आगे बढो' चा आशिर्वाद दिला. साहित्यातली कितीतरी लहान मोठी माणसे अशी आहेत की ज्यांना








खांडेकरांमधल्या ह्या निरहंकारी, देवत्वाचा स्पर्श घेऊन आलेल्या भावनेचा प्रत्यय आलेला आहे. जीवनातले आणि कलेतले 'महत्तम'त्व त्यांनी ठीक जाणले आहे. साहित्य हा त्यांच्या श्रद्धेचा, पूजेचा विषय त्यांनी मानला आहे. खांडेकरांनी तारुण्यातल्या उत्साहात कै. (हाय) स. अ. शुक्लांच्या 'सौभाग्यलक्ष्मी' नाटकावर कडाडून हल्ला चढविला होता. पण तेच खांडेकर तीन वर्षांपूर्वी शुक्ल सत्काराला अध्यक्ष म्हणून आले, आणि त्यांनी शुक्लांच्या साहित्य-सेवेचा गौरव केला व आपल्या टीकेतली 'अतिउत्साही' चूक मान्य केली. चूक मान्य करायला मनाचे फार मोठेपण जवळ असावे लागते. खांडेकरांजवळ ते आहे ह्याचा प्रत्यय मीही अनेकवार घेतला आहे. यश, द्रव्य, अनेक मानसन्मान आणि आता पद्मभूषणसारखे मानाचे किताब लाभूनही खांडेकर 'माणसात' आहेत—राहतील हा मला विश्वास वाटतो. खांडेकरांच्या साहित्य संसाराकडे व त्यांच्या शरीर प्रकृतीकडे पाहिलं की, असं वाटतं की, ह्या माणसाने हे सारं लिहिलं कशाच्या बळावर ? ह्या प्रश्नाचं उत्तर शोधायला फारसं दूर जावं लागत नाही. खांडेकरांच्या साऱ्या शक्ति-मर्यादांची उत्तरं त्यांच्या साहित्यातच गवसतात. साहित्य हा जर लेखकाच्या मनाचा आरसा असेल, तर खांडेकरांच्या व्यक्तित्वाचे प्रतिबिंब त्यांच्या लेखनसंभारातच मिळेल. पन्नास पन्नास वर्षे ही माणसे सतत लिहीत आहेत. जीवन झपाट्याने बदलत आहेत. मूल्ये संभ्रमात सापडली आहेत. श्रद्धांना तडे जात आहेत. आजचा बुद्धिजीवि माणूस फार मोठी मानसिक कुचंबणा अनुभवीत आहे. अशाही काळात खांडेकर ताठ मानेने उभे आहेत. म्हणताहेत **"समाजाला सारखं काहीतरी सांगावसं वाटतं. स्वतःची व समाजाची प्रतारणा करून लेखणी उचलली नाही. काळाबरोबर जे बदलत गेलं त्याचा शोध घेतला. त्याची कारणे शोधण्याचा प्रयत्न केला. कलावंत हा समाजमनाचा द्योतक असतो. आपल्या संवेदनाक्षम मनाने तो समाजमनाची स्थिति टिपतो आणि कलेच्या द्वारे व्यक्त करतो."** समाज—साहित्याचं हे नातं खांडेकर सतत मानीत आले आहेत आणि म्हणूनच खांडेकर अजून 'ताजे' आहेत. जीवन जितकी 'नवता' क्षणाक्षणाला धारण करते आहे, तितकीच नवता खांडेकरी साहित्य आविष्कृत करणार आहेत. "जीवन 'ज्यांना' कळले हो, जीवन 'त्यांना' कळले हो" असेच भाऊसाहेबांच्या आजच्या 'उमेदी' ऐकल्या, वाचल्यानंतर म्हणावेसे वाटते. 'पद्मभूषण' ही एक नवी भलावण (शासकीय) पण खांडेकर हे ह्यापूर्वीच 'अखिल भारतीय' कीर्तीचे लेखक झाले आहेत. भाषिक वादात आत्यंतिक भूमिका घेणाऱ्या तामिळी मंडळीत 'खांडेकर' भलतेच लोकप्रिय आहेत—एकमेव मराठी लेखकाला हे भाग्य लाभले आहे. खांडेकरांच्या जीवननिष्ठेचा हा विजय आहे असेच मी मानतो.

पद्मभूषण भाऊसाहेबांचे अभिनंदन !!

## 'साहित्यनिष्ठ' वामनराव ढवळे

मुं. म. साहित्य संघाचे एक कार्यवाह श्री. वा. रा. ढवळे ह्यांच्या वयाला साठ वर्षे झाली. ते कार्यालयातून (टपालखाते) निवृत्त झाले आहेत. ते एक गृहस्थ आहेत. संसारातही ते सुखी आहेत. पण वा. रा. ढवळे यांचा गौरव जो होत आहे त[illegible]ाबद्द[illegible] होत नाही. 'बाळबोध' जीवनाचे कित्ते गिरविणाऱ्यांच[illegible] सत्कार सम[illegible]ज करीत नाही. काही 'वाकडी वळणे' घेऊन पर्यायाने [illegible] "म[illegible]जकारणी" लागतात त्यांचा समाज गौरव करतो. सर्वसम[illegible] 'बाळबोध' वळणाचा रहावा म्हणून ह्या वाकड्या वाटा त्यांनी चोखाळलेल्या असतात. "वा. रा. ढवळे", एक पोस्टातील पदाधिकारी, सेवानिवृत्त वगैरे कारणे सत्य आहेतच. पण ढवळे हे 'साहित्यनिष्ठ' आहेत म्हणून गौरव होत आहे. निष्ठांच्या काळात ते जन्मले, निष्ठांच्या सान्निध्यात आले आणि त्या निष्ठातून 'ऐहिक लाभ' नसतानाही 'झीज सोसून' त्यांनी त्या जपल्या-वाढविल्या. येणाऱ्या पिढीला त्या देण्याचा यत्न केला (साहित्य संघाचे अभ्यास वर्ग) आणि 'साहित्य संघा'च्या पायात ठामपणे स्वतःला गाडून घेऊन आज ते सतत 'स्थिर' स्वरूपाची साहित्यसेवा करीत आहेत. साहित्य संघाचे साहित्यविषयक जे कार्य चालते त्याचे शिल्पकार आहेत श्री. वा. रा. ढवळे ! वास्तविक 'वा. रा. ढवळे' आणि 'संपादक' ह्या दोन शब्दांचे नाते फार जवळचे ! ढवळ्यांचे खरे स्वप्न ! खरी कर्मभूमी ! पण "चांगली मासिके आणि धंदा" यांचे प्रमाण मराठीत तरी 'व्यस्त'च आहे. ढवळे हे मूल्ये मानणारे, निष्ठावंत साहित्यिक आहेत. 'स्वस्त' असे काही करावे. क्षणिक आनंद मानून रहावे अशी त्यांची वृत्ति नाही. त्यामुळे मराठीतल्या काही दर्जेदार (पण धंदा करू न शकणाऱ्या) मासिकांचे ते संपादक झाले तरी त्यांच्या संपादन कौशल्याचा दीर्घ काळ लाभ मराठी साहित्याला झाला नाही. पारिजात, ज्योत्स्ना, साहित्य, साहित्य परिषद पत्रिका ह्यांचे ते संपादक होते. त्यातून त्यांना फार मोठे 'मित्रमंडळ' मिळाले. नवाकाळ, श्री लोकमान्य, श्रद्धानंद, करमणुक, भविष्यदीप इत्यादि नियतकालिकातून त्यांनी प्रारंभी लेखन केले. नवाकाळमध्ये प्रा. न. र. फाटक यांचा परिचय झाला व फाटकांनी त्यांना टेबलखुर्ची भेट दिली. ढवळे तीच 'साभिमान' वापरतात. दोघांच्याही साहित्यनिष्ठेचे हे उदाहरण मनोज्ञ आहे. चाळीस वर्षे ढवळे पोस्टात नोकरी करीत होते. कारकुनी करता करता ते पदवीवर झाले. आणि सेवानिवृत्त होताना ते असिस्टंट प्रे. पोस्टमास्तर झाले होते. पण त्यांचा पिंड मात्र साहित्य, काव्य यावरच पोसला गेला. साहित्य-निष्ठा हीच त्यांची जीवननिष्ठा बनली होती. साहित्य संघाचे अभ्यासवर्ग नीट चालावेत, त्यांना प्रतिष्ठा लाभावी, त्यातून साहित्यिकांच्या नव्या पिढीची निर्मिती व्हावी, साहित्या-संबंधी उत्साहाचे वातावरण निर्माण व्हावे यासाठी ढवळे हे नेहमी कार्यरत असत. काव्य शिकविताना तर ते इतके रंगत की शिकवीत असलेली कविता जणु त्यांचीच आहे असे ऐकणाऱ्याला वाटावे. तांबे, चंद्रशेखर, यशवंत, कुसुमाग्रज, बोरकर, खांडेकर हे त्यांच्या जिव्हाळ्याचे, अभ्यासाचे विषय ! काव्यावर श्रद्धा मोठी. कविता करता करता गवसलेली ! हस्ताक्षर रेखीव. वाणी स्वच्छ, आवाजाला एक प्रकारचा 'व्हॉल्यूम' लाभलेला. पोषाख साधा पण नीट-नेटका—स्वच्छ ! खास 'मऱ्हाठी' असणारा ! वृत्ति तशी गंभीर, चिंतनशील. वागणे सौजन्याचे. धीर देणारे, प्रोत्साहित करणारे. साहित्यातच रमणारे. आणि साहित्यासाठी सारे अ[illegible]गात हसत हसत झेलणारे ! चाळीस वर्षे नोकरीही केली आणि चाळीस वर्षे पत्र-साहित्याचीही सेवाच केली. नोकरीतून ते निवृत्त झाले असले तरी, साहित्य हा काही त्यांच्या 'निवृत्ती'चा विषय नाही. [illegible]वृत्ती'चा [illegible]ाहे. ती प्रवृत्ती त्यांच्या हातून आता भरीव साहित्य निर्मिती व साहित्य-विषयक कार्य घडवून आणील असा मला विश्वास वाटतो. वया[illegible]ार काही व्यसने लागतात, सुटतात. पण 'साहित्य' एक असे वेड आहे की जे लागते पण सुटत मात्र नाही. इतर व्यसने क्वचित मारकही ठरतात. साहित्य मात्र स्वतःला आणि समाजालाही तारक ठरते.

असे 'तारक' मंगल साहित्य श्री. ढवळे यांनी द्यावे. साहित्य सेवे-साठी 'निवृत्ती'ची सं[illegible] मिळाली म्हणून अभिनंदन.








# कलातपस्वी मुरलीधर आचरेकर



'कलातपस्वी' हा शब्द मी जाणीवपूर्वक व सार्थ अभिमानाने वापरला आहे. कलेच्या कुठल्याही क्षेत्रात, ज्ञानाच्या कोठल्याही क्षेत्रात तपस्या ही करावीच लागते. ती तपस्या त्या त्या विषयाच्या आत्यंतिक गोडीतून आणि आत्यंतिक ओढीतूनच जन्म पावत असते. त्या तपस्येचे 'मोल' दिल्याशिवाय कोठल्याही क्षेत्रात 'मौलिक' असे काही करता येत नाही. तसे मोल आचरेकर यांनी दिले आहे. अगदी वयाच्या दहाव्या वर्षापासून दिले आहे. जिद्दीने दिले आहे. आत्मसाक्षात्काराच्या जाणीवेतून दिले आहे. लौकिक शिक्षणाचे मोल देऊन दिले आहे. आणि म्हणून गेली चाळीस पन्नास वर्षे "एम. आर. आचरेकर" हे नाव हे एका श्रेष्ठ कला प्रकाराशी निगडित म्हणून गाजते आहे. श्रेष्ठ कलादिग्दर्शक म्हणूनही ते नाव आज चित्रपट रसिकांना सुपरिचित झाले आहे. हे सारे लाभूनही आचरेकर 'तृप्त' नाहीत. कलादृष्ट्या अजून पुष्कळ काही करण्यासारखे आहे असे त्यांना वाटते आहे ह्यातच त्यांच्या कलेची व त्यांच्यातल्या कलावंताची 'चिरनवता' दिसून येत आहे असे मला वाटते.

शिक्षणापेक्षा चित्रकलेतच आपल्या मुलाची गति आहे. तेथेच तो काही प्रगति करून दाखवू शकेल ह्याची जाण येताच त्यांच्या वडिलांनी त्यांना वयाच्या १० व्या वर्षी केतकर्स आर्ट इन्स्टिटयूटमध्ये घातले. तेथून ते जे.जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये गेले. पण विद्यार्थी-दशेतच ते इतर विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करू लागले. मध्येच ते शिक्षण अर्धवट टाकून ते पेंटिंग्ज व कमर्शियल कामे करू लागले. विविध प्रदर्शनात चित्रे पाठवू लागले. पण खंत कायम होती. १९२९ त ते परत आर्ट स्कूलमध्ये गेले. पण 'डिप्लोमा'त ते अनुत्तीर्ण झाले. पण जिद्द कायम होती. बॉम्बे आर्ट सोसायटीच्या प्रदर्शनात त्यांना त्याच सुमारास रौप्यपदक मिळाले. प्रिन्सिपल सॉलोमन ह्यांनी त्यांच्या कलेचे कौतुक केले. पारितोषिक दिले. नंतर अनेक खटपटी लटपटी (चांगल्या) करून ते इंग्लंडला गेले व रॉयल कॉलेज ऑफ आर्टमध्ये त्यांनी शिक्षण घेतले. लंडनला असताना तेथे भरलेल्या गोलमेज परिषदेचे त्यांनी काढलेले चित्र फार गाजले. लेडी विलिंग्डनना ते फार आवडले. भारतात आल्यावर व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांचे आचरेकरांनी सुंदर पोर्ट्रेट तयार केले. लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या वाचनालयात ज्याचे चित्र लागले गेले असे पहिले चित्रकार आचरेकरच !

१९३५साली पंचम जॉर्ज यांच्या राज्यारोहणाचा रौप्य महोत्सव शाही इतमामाने साजरा झाला. त्यासाठी व्हॉइसरॉयनी खास प्रतिनिधी म्हणून आचरेकर यांना पाठविले. तेथे त्यांनी खूप चित्रे तयार केली. भारतीय राजे महाराजांनी नंतर आचरेकरांकडून बरीच चित्रे तयार करून घेतली. बॉम्बे स्कूल ऑफ आर्टचे डेप्युटी डायरेक्टर म्हणून त्यांनी दोन वर्षे काम केले. नंतर सुप्रसिद्ध चित्रनिर्माते ए. आर. कारदार यांनी त्यांची चित्रे दिल्लीत पाहिली व त्यांना कला दिग्दर्शक म्हणून पाचारण केले. पण त्या कलेबद्दल मत चांगले नसल्याने ते गेले नाहीत. कारदार पगार देतच राहिले. 'शहाजहाँ'चे कलादिग्दर्शन त्यांनी केले. पुढे 'राजकपूर' ने त्यांची कला जाणली व काहीतरी जिद्दीने करून दाखविण्याची राजची वृत्ति आचरेकरांना पसंत पडली. रास जमली. कलास्वातंत्र्य न गमावता आचरेकर राजचे काम करीत आहेत.

चित्रपट व्यवसायात अनेक वर्षे घालवूनही ते मनाने त्यात नाहीत. अर्थातच त्यांनी सर्व अंगाचे परिपूर्ण ज्ञान करून घेतले आहे. म्हणूनच त्यांच्या कागज के फूल, परदेसी, जिस देशमे गंगा वगैरे चित्रपटांना फिल्मफेअरची पारितोषिके मिळाली आहेत.

आचरेकर म्हणजे पोर्ट्रेट्स् आणि रेखाचित्रे ! पोर्ट्रेट पेंटिंगचे तर ते 'मास्टर' म्हणून मानले जातात. रेखाचित्रातला 'आचरेकरी' सफाईदार हात किती वेगाने चालतो ह्याचा प्रत्यय अनेकांनी घेतला आहे. त्यांचे **'रुपदर्शनी'** हे पुस्तक जुनी भारतीय चित्रकला सोप्या रूपात मांडणारे अप्रतिम पुस्तक म्हणून मानले जाते. **"अपोस्टल ऑफ पीस" स्काय क्रेपर्स अँण्ड वी फ्लाँइंग गंधर्वाज् फीमेल न्यूज** ही त्यांची गाजलेली पुस्तके. साठीच्या उंबरठ्यावर उभे असूनही आचरेकर चित्रमय महाभारत, मेघदूताची स्वप्ने पाहू शकतात. त्यातल्या रेखा आणि रंग त्यांना अजूनही बोलावू शकतात, ह्यातच आचरेकरांच्या 'तपस्वि'तेचा प्रत्यय येतो. म्हणूनच ह्या 'तरुण' कलातपस्व्याचे मी अभिनंदन करतो.

# तरुण संपादक तळवलकर

'दीपावली' चे एक चाहते, लेखक व सुहृद् श्री. **गोविंद तळवलकर** हे १५ फेब्रुवारीपासून **'महाराष्ट्र टाइम्स'** ह्या दैनिकाचे संपादक म्हणून नियुक्त केले गेले आहेत. मराठीतल्या (मुंबईतल्या) चार प्रमुख दैनिकांच्या संपादकपदावर तुलनात्मक दृष्टया तरुण अशी संपादक मंडळी नियुक्त झाली आहेत ही गोष्ट मोठी शुभसूचक व बदलत्या काळाची निदर्शक आहे असेच मी मानतो. तळवलकर हे वयाने तरुण संपादक असले तरी अनुभव, वाचन, मनन, चिंतन ह्यादृष्टीने कर्तबगार संपादक आहेत असे खात्रीने म्हणता येईल. त्यांचे हे कर्तृत्व स्वयंनिर्मित व स्वकष्टार्जित आहे. तळवलकर ह्यांचा जन्म डोंबिवलीलाच झाला आणि डोंबिवली ते मुंबई ह्या प्रवासातच त्यांच्या साऱ्या कर्तृत्वाची जडण-घडण झाली. शालेय शिक्षण दादरला झाले आणि मॅट्रिक झाल्यावर त्यांनी फॉरिन पोस्ट ऑफिसमध्ये नौकरी पत्करली. कौटुंबिक दायित्व होतेच. पण मनात जिद्द मोठी, शिक्षणविषयक आस्था मोठी. म्हणून त्यांनी नौकरी करून रुइया कॉलेजात नाव घातले. शिक्षण व नौकरी करीत

असतांना त्यांचा इतरही व्यासंग चालूच होता. त्याच काळात त्यांनी डोंबिवली येथील सामाजिक कार्यात भाग घेतला व राजकीय अभ्यास मंडळ चालवले. महाराष्ट्रातील अनेक राजकीय विचारवंतांची व्याख्याने त्यांनी घडवून आणली. श्री. ह. रा. महाजनी ह्यांचा त्यांचा परिचय त्या कार्यातच घडून आला व पुढे महाजनी लोकसत्तेचे संपादक झाले तेव्हा त्यांनी तळवलकर यांना लोकसत्तेत पाचारण केले. आजच्या संपादक तळवलकरांची वृत्तपत्रीय कारकीर्द लोकसत्तेत सुरू झाली. तेथे त्यांनी आपल्या अभ्यासपूर्ण व शैलीदार लेखनाने 'नाव' केले आणि 'महाराष्ट्र टाइम्स' निघाला तेव्हा त्यात नेमला गेलेला पहिला पत्रकार म्हणून ते नाव सिद्ध केले. आज अवघ्या तीनचार वर्षानंतर तळवलकर संपादक म्हणून नियुक्त होत आहेत. गेल्या महिन्या दोन महिन्यात त्यानी 'महाराष्ट्र टाइम्स'चा जो कायाकल्प घडवून आणला आहे तो पाहिला की 'नांदी' तर रंगली असे म्हणण्याचा मोह होतो. व्ही. शांताराम, दामुअण्णा मालवणकर, कै. ज. के. उपाध्ये यांची आत्मचरित्रे-निवेदने व कै. डॉ. केतकर यांच्या पत्नीने सांगितलेल्या त्यांच्या आठवणी, राजकीय, सामाजिक क्षेत्रातल्या नामवंतांचे घेतलेले सहाय्य, ह. रा. महाजनी, ना. ग. गोरे यांच्या लेखनाला दिलेले महत्वपूर्ण स्थान, पंधरा [illegible] होणारे त्यांचे स्वतःचे मार्मिक लेखन इत्यादि गोष्टी त ळवलकर यांच्या साक्षेपी संपादनाची ग्वाही देतात. 'महाराष्ट्र टाइम्स' चे [illegible] ही तळवलकर यांची निर्मिती आहे. तळवलकर शांत वृत्तीचे आहेत. वाचनात व चिंतनातच रंगण्याची वृत्ति त्यांच्या जवळ आहे. 'शो-मनशिप'चे त्यांना वावडे आहे. राजकारणाचा त्यांचा व्यासंग व त्यांचे चिंतन सतत चालू असते. त्यातूनच 'टिळक दर्शन' हा ग्रंथ त्यांनी लिहिला. आता दादाभाई नवरोजी नंतरच्या राजकीय आंदोलनाचा आलेख देणाऱ्या ग्रंथाचे ते लेखन करीत आहेत. परदेशप्रवास करून आल्यावरही "साहेबाचे ते सारेच चांगले" अशी आंधळी व एकांगी भावना त्यांना स्पर्श करू शकली नाही. आपल्या मातीत त्यांचे पाय घट्ट रोवलेले आहेत. तळवलकर वयाच्या अवघ्या चव्वेचाळीसाव्या वर्षी 'महाराष्ट्र टाइम्स'सारख्या ख्यातकीर्त पत्राचे संपादक झाले आहेत. मी त्यांना सुयश चिंतितो व त्यांचे अभिनंदन करून म्हणतो "नांदी रंगली. आता नाटकही रंगू द्या !!"

**—आदित्य**

**● दीपावलीचे एक सहृद कुटुंबीय श्री. गोपाळकृष्ण भोबे यांचे मडगाव येथे अकाली दुःखद निधन झाले याबद्दल आमचेकडे शोक व्यक्त करणारी अनेक पत्रे दुरून दुरून आली. कित्येक परिचितानी आणि अपरिचितानी प्रत्यक्ष भेटून तर अनेकानी तारा आणि दूरध्वनी द्वारा आमचेकडे दुःख प्रगट करून आमच्या दुःखात ते सहभागी झाले. त्या सर्वांना व्यक्तीगत आभारपत्रे पाठविणे शक्य नसल्याने येथेच सर्वांचे जाहीर आभार मानीत आहोत. कै. भोबे यांच्या संबंधी अनेकानी आठवणीवजा आणि विविध संस्मरणात्मक लेख दीपावलीतूनच प्रकाशित करण्याची इच्छा प्रदर्शित केली असून त्यांच्या कुटुंबियांना आर्थिक सहकार्यही अत्यंत आपुलकीने व जिव्हाळ्याने देण्याची इच्छा व्यक्त केली आहे. यासंबंधी एक निश्चित स्वरुपाची योजना आखण्यात येत असून ती दीपावलीच्या पुढील अंकात सविस्तर दिली जाईल.**

**--संपादक दीपावली**

[**पृष्ठ ६ वरून—अंगना तो....**]

ते जाणूनहि त्याचा बडेजाव तू दाखविला नाहीस. रात्र रात्र जागून आणि बारा बारा तास एकेका गायकाच्या सहवासात राहून कलावंतांचे नवनवोन्मेष तू मराठी वाचकासमोर उघळलेस. मुक्त हस्तानी, मुक्त शब्दानी, भरल्या अंतःकरणाने. अरे कां ? कां केलेस हे तू ? एकलव्यासारखा तू मोठा झालास. एकलव्यासारखं तू स्वतःचं स्थान निर्माण केलंस. आणि आम्ही तथाकथित सुशिक्षित बुद्धिवादी, आणि अहगंड लोक तुला उद्या कोणते स्थान देऊ माहीत आहे ? एकलव्याला महाभारतात असणारे तेच ते "किंचितोल्लेखी" स्थान ! आंगठा कापून दिला ना! भोबे अरे तू असाच झिजलास– आमच्यासाठी, संगीतासाठी, गायकांसाठी आणि संगीतकारांसाठी.

तुला ना, तुझ्याच एका कथेतील प्रश्न विचारावासा वाटतो. चहूकडे भंपकपणाचे नाले भळभळ वाहात असताना, खोटेपणाने लडबडलेले जग त्यात आंघोळ करून नाचत असताना, भोबे त्या क्षणांची सती होऊन तू काय साधलेस ? तू म्हणशील, नेहमीप्रमाणे "कुणाला आहे वेळ या अशा गोष्टींकडे लक्ष द्यायला ?"

"हम भये जोगिया ! जंगम जगत छांड ॥"
होय. . . जंगम जगत छांड !

मरणान्तानि वैराणि. . . म्हणून फक्त गप्पा मारणाऱ्या समाजाचे आम्ही घटक. आमची तू केलेली किंमत योग्य आहे. आणि तुझे दोष का मी जाणत नाही ? ते तर आमच्या समाजाचेच स्थायीभाव. तुझ्यातून ते उभे राहिले की ते दोष ठरत.

तुझी ती नेहमीची घाई, गडबड पाहून मनात मात्र ही शंका कधीच आली नाही की तू त्याच घाईने आमच्यातूनहि निघून जाशील. आणि गेलासहि तसाच अचानक. कुणालाहि न सांगता. न बोलता. मध्यलयीतले "सादरे"प्रिय असणारा तू जीवनातून मात्र या अशा द्रुतलयीत निघून गेलास. का तुला प्रिय असे काहीच नव्हते या .थे ? तूच म्हणत होतास ना ? की भीमसेनची तोडी अजून कितीतरी वर्षे ऐकायची आहे. गुलामअलींची "मंदर देख डरे सुदाम" संपूच नये असं वाटतं. अमीरखाँची दरबारीची आलापी वर्षानुवर्षे मी एकाच जागी बसून ऐकेन. मग ही घाई कां केलीस ? कां केलीस ?

अंगना तो पर्वत भई
देहली भई बिदेस
लो बावुल मैं तो चली
चली पियाके देस ।

परवा तू याच ओळी गुणगुणत होतास. नाट्यसम्मेलनाच्या शेवटच्या दिवशी. भर दुपारी. म ग हेच सुचवायचं होतं का तुला ! ★★★





अनुक्रमणिका

# यमाचे थैमान

पुन्हा एकदा मृत्यु मोकाट सुटला आहे. भराभर माणसे टिपीत तो चालला आहे. मोठी माणसे, कर्तृत्ववान माणसे, गुणी माणसे टिपीत तो पुढे निघालेला दिसतो आहे. ह्या देशात आणि दक्षिण व्हिएटनाम-मध्येही त्याचे थैमान चालू आहे. ह्या थैमानात लोकनायक माधव श्रीहरि अणे, कवि-नाटककार सदाशिव अनंत शुक्ल, गोमंतकातील विख्यात समाजसेवक व साहित्यिक का. दा. नायक, संगीततज्ञ-रसिकवर काकासाहेब मोहिले, हिंदीतील सुप्रसिद्ध साहित्यिक पं. माखनलाल चतुर्वेदी आणि भारतीय जनसंघाचे विद्यमान पं. दीन-दयाळ उपाध्याय ह्यांचे सारखे मोहरे त्याने टिपले आहेत. काही होती तशी पिकली पाने. मृत्यूशी झुंज देत देत त्यानी जीवन कंठले होते. कांहींचा मृत्यु हा अकल्पित रीतीने घडून आला आहे. परंतु कर्तृत्ववान माणसांचा मृत्यु हा एका व्यक्तीचा मृत्यु कधी असत नाही. ती हानी असते त्या त्या समाजाची ! कै. माधवराव अणे ही एक व्यक्ति नव्हती. टिळकयुगापासून विदर्भात झालेल्या सर्व राजकीय आंदोलनातली ती एक शक्ति होती. अणे यांची सर्वच राजकीय मते टिळक-गांधी युगातही साऱ्यांना पटतील अशी नव्हती. स्वतंत्र विदर्भाचा त्यांनी अलिकडच्या काळात केलेला पुरस्कार तर महा-राष्ट्रात त्यांच्या विषयी वसत असलेल्या आदराला धक्का देणारी गोष्ट ठरली होती. परंतु माधवराव अणे हे आपल्या विवेकबुद्धीला स्मरून वागणारे गृहस्थ होते. कांग्रेसमध्ये राहूनही त्यांनी स्वतंत्र विदर्भाची मागणी सोडली नाही, त्याच विषयावर भर देऊन त्यांनी निवडणुक लढविली हे अलिकडचे उदाहरण, तर १९४१ साली व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव्हवर झालेली नेमणुक त्यांनी स्वीकारली हे दुसरे उदाहरण ! १९४२ साली 'चले जाव' आंदोलन सुरू झाल्या-वर म. गांधी आदि मंडळींना अटक झाली तेव्हा त्यांनी त्या पदाचे त्यागपत्रहि दिले. १९४७ साली त्यांची बिहारचे राज्यपाल म्हणून नेमणूक झाली. माधवराव अणे हे केवळ राजकारणी नेते नव्हते. ते संस्कृत पंडित, विद्याव्यासंगी गृहस्थ होते. लोकमान्यांचे संस्कृत चरित्र त्यांनी लिहिले होते ही एकच गोष्ट त्यांच्या पांडित्याची द्योतक आहे. अणे यांच्याशी मतभेद असणाऱ्या माणसांनाही अणे यांच्या गुणवत्तेसंबंधी, देशभक्तीविषयी, समाजकल्याण भावने-विषयी शंका नसे इतके विशुद्ध जीवन ते जगले. त्यांच्या मृत्यूने जुन्या, तेजस्वी टिळक परंपरेचा अखेरचा दुवा निखळला आहे.

कवि सदाशिव अनंत शुक्ल ही एक बहुगुणी व्यक्ति होती. ते शीघ्रकवि होते तसेच उत्तम ज्योतिषीही होते. "साधी राहणी आणि उच्च विचारसरणी" ह्या परंपरेत बसतील असे ते होते. साहित्य हा उपजीविकेचा व्यवसाय होऊ शकतो काय ह्या प्रश्नाचे 'चोख' उत्तर देणारे जे काही चारदोन साहित्यिक मराठीत आहेत (वा होते) त्यात शुक्लांचा समावेश व्हायचा. 'कुमुदबांधव' ह्या टोपण नावाने शुक्लांनी शेकडो उत्तम गीते–कविता मराठीला दिल्या. तर सिंहाचा छावा, स्वर्गावर स्वारी, मीराबाई, सौभाग्यलक्ष्मी, सत्याग्रही वगैरे सारखी नाटके लिहून त्यांनी मराठी रंगभूमीला एक नवे दालन दिले. पौराणिक नाटके व भक्तिपर गीते ही शुक्लांची फार मोठी देणगी मराठीला लाभली आहे. गरिबी व होणारे तत्सम आघात यामुळे माणसांना पुष्कळदा कडवटपणा येतो. पण शुक्लांचे एकूण आयुष्यच ह्याला अपवाद होते. ज्योतिष, साहित्य, पटकथा संवाद लेखन, नाट्य इत्यादि गुण असूनही शांत, प्रसिद्धिपराङ्मुख वृत्तीने शुक्ल जगले. 'न्याय मिळाला नाही' म्हणून रुखरुख व्यक्त केली नाही की जगावर वैतागले नाही. विड्यांचे झुरके घेत बसलेली बलवंत पुस्तक भांडारातली ती मूर्ति आता यापुढे दिसत नाही, दिसणार नाही. नवे भावगीत 'मूक' झाले–कायमचे !

अ. भा. जनसंघाची एक फार मोठी हानी झाली आहे. श्यामा-प्रसाद मुकर्जींच्या निधनाने, डॉ. रघुवीर यांच्या मृत्यूने जो आघात जनसंघावर झाला, तसाच एक प्रबल आघात जनसंघावर झाला. पं. दीनदयाळ उपाध्याय निधन पावले. मृत्यूच्या मागे तूर्त तरी गूढतेचे वलय आहे. माणूस मात्र निघून गेला आहे. एक तरुण, त्यागी, विद्याव्यासंगी, साहित्यिक प्रकृतीचा, थोर अर्थतज्ञ आणि द्रष्टा विचारवंत ह्या देशाने गमावला आहे. दोन महिन्यातच त्यांची अध्यक्षीय कारकीर्द अशा विचित्र रीतीने संपावी हा दुर्विलासच म्हटला पाहिजे. जनसंघाच्या प्रारंभकालापासून दीनदयाळांचे नाव त्याच्याशी निगडित होते. गेल्या १५।१७ वर्षात त्यांनी केलेले प्रचंड कार्य ध्यानी घेऊन त्यांच्यावर अध्यक्षपदाची धुरा टाकण्यात आली होती. कालिकत गाजले. आणि आता त्यांचा मृत्यु असा गाजला. श्यामा बाबू म्हणत "असे आठ दहा दीनदयाळजी मला मिळतील तर मी ह्या देशाचे चित्र बदलून दाखवीन" आज श्यामा बाबूंच्याच वाटेने व तसाच संशयास्पद मृत्यु लेवून दीनदयाळजी गेले आहेत. देशाचे चित्र पालटण्याचे काम राहून गेले आहे. विघटनकारी शक्तींचे थैमान चालू असताना एक महान संघटक निघून गेला आहे ह्याबद्दल जास्त खंत वाटते. आघातातून संघर्षाची ईर्षा पेटते म्हणतात. दीन-दयाळजींच्या मृत्यूने फार मोठी हानी झाली आहे हेच खरे ! !

हिंदीतील क्रान्तदर्शी, थोर कवि पं. माखनलाल चतुर्वेदी हे ३० जानेवारी १९६८ च्या हुतात्मा दिनी निधन पावले. ते देशभक्त होते. त्यागी होते. उत्तम कवि होते. महामना होते. उदार होते. कमलाच्या द्रोणातून रसिकांना मधुपान घडविणारा हिंदीतला हा महाकवि. हिंदीसाठी शेवटी त्यांनी 'पद्मभूषण' हा किताब परत केला. आणि मुक्त मनाने ते गेले. भारतीय साहित्यातला खरा खुरा 'मख्खन'लाल निघून गेला आहे.

ह्या साऱ्या थोर भारतपुत्रांच्या पवित्र स्मृतीला अभिवादन ! !

—संपादक 'दीपावली'










सर्व बळ एकवटून...एकीने...जिद्दीने खेचून घेऊ.
परिश्रमांची पराकाष्ठा करून...प्रयत्नांचे समाधान व यशाचा निर्भेळ आनंद पदरी पाडून खेचत रहाण्याचे तंत्र आम्हाला सुरुवातीपासून साध्य झाले आहे.
'स्वस्तिक'ला रबर धंद्यातील अग्रस्थान प्राप्त होण्यापूर्वी—
एका छोट्या शेडमध्ये धंद्याची अल्पांशाने सुरुवात ...२५ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव...तज्ञांचा सखोल अभ्यास....मालाची विक्रीपूर्व चाचणी...आणि याहीपेक्षा अधिक म्हणजे मनातील जिद्द.
सहाजीकच आमच्या रबरी उत्पादनांचा दर्जा सर्वोत्कृष्ट आणि अजोड असणारच.
'स्वस्तिक'ची कांही रबरी उत्पादने—
होज पाइप्स, रबरी बुचे, ऑटो पार्टस्, ऑईल सील्स्, ॲडीझीव्हज्, हवामानविषयक बलून्स्, लॅटेक्स उत्पादने-उदा. हातमोजे (शस्त्रक्रीयेसाठीं, औद्योगिक व घरकामासाठी), रबर गमबूटस् आणि कॅन्व्हॅस बूट्स् व इतर विविध पादत्राणे.
स्वस्तिक
स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लिमिटेड. खडकी, पुणे-३.


अनुक्रमणिका

# अधिक धान्योत्पादन ! अधिक फायदा !! अधिक बचत !!!

यांसाठीं




## डिझेल एंजिन्स

यांचीच निवड आवश्यक आहे...

...कारण, अत्यंत कार्यक्षम व बिनतक्रार चालणारीं अशीं हीं किर्लोस्कर एंजिनें, अधिक धान्योत्पादन व अधिक कमाई करण्यास अत्यंत उपयुक्त असल्याबद्दल त्यांची ख्याति आहे. किर्लोस्कर एंजिनें चालविण्यास लागणारा तेलाचा खर्च, बाजारांतील इतर एंजिन्सला लागणाऱ्या खर्चाच्या मानानें फारच कमी येतो; त्यामुळें तेलाच्या खर्चांत दर दिवशीं अंदाजें दोन रुपयांची बचत होते.

याशिवाय देशांत किर्लोस्कर डीलर्स गांवोगांवीं पसरले असल्यामुळें विक्रीनंतरची देखभाल करण्यास व त्यांस लागणारे अस्सल सुटे भाग मिळण्यास अडचण पडत नाहीं.




[illegible] १, तीन हॉर्स पॉवर

एव्ही १, पांच हॉर्स पॉवर

१ एम्, दहा हॉर्स पॉवर

**किर्लोस्कर ऑइल एंजिन्स, लिमिटेड.**

रजि. ऑफिस: एल्फिन्स्टन रोड, पुणे-१ (भारत)

KO: 4445 MAR